— सामाजिक विज्ञान हे सर्वांत दुबळे विज्ञान आहे. ह्याविषयीचा एक विचार तुम्हाला सांगतो. हाही नागार्जुनासारखा विचार आहे. ह्या ज्या सर्व दृष्टी आहेत त्यांच्यामधून जावे, तसेच हे जे विविध सामाजिक विचार आहेत, त्यांच्यामधून जावे. ते जवळ ठेवावे. नागार्जुन सर्व दृष्टींमधून जावे पण त्या सोडून द्याव्या असे म्हणतो. तसे मी म्हणत नाही. हे विचार जवळ ठेवावे; पण अनुभवाने पुढे जावे. म्हणजे कार्यक्रम आखावे, आणि ते अंमलात आणताना येणाऱ्या अनुभवांच्या आधारे पुढे जावे. काही सामाजिक प्रश्न पूर्णपणे सुटतात असे सामाजिक क्रांतिकारक म्हणतात आणि आपल्या अभिनिवेशात ते रंगले की मग ते एकदम पुढे जातात. पण हे करताना एक तात्त्विक अलिप्तता आवश्यक असते. ती असल्याशिवाय आपल्या देशाच्या किंवा जगाच्या पुढे असलेले प्रश्न सोडविण्याचा मार्ग सापडणार नाही. माणसाने 'फंडॅमेन्टलिस्ट' बनता कामा नये. हिंदू किंवा इस्लामी किंवा मार्क्सवादी फंडॅमेन्टलिस्ट हे जगाला दुःखात, 'शून्यां'त लोटणार आहेत. म्हणून सर्व प्रश्न लवकर सुटतात, काही दीर्घकालाने सुटतात, आणि काही सुटत नाहीत हे ओळखले पाहिजे. ते सोडवण्याचा प्रयत्न करीत राहिले पाहिजे, पण ते पूर्णपणे सुटणार नाहीत ही खूणगाठही मनात बाळगली पाहिजे. कारण लायब्निट्झप्रमाणे हे जग त्यातल्या त्यात चांगले जग आहे असे काही मी मानत नाही. हे जग बदललेच पाहिजे हा मार्क्सचा सिद्धांत मी पूर्णपणे मानतो. हे जग बदललेच पाहिजे; ते सुधारलेच पाहिजे. हे पापी जग आहे असे मी मानतो. त्याच्यात विषमता आहे. खाजगी संपत्ती चौर्य आहे असे मी म्हणत नाही, पण ती शोषणावर आधारलेली आहे हे मी मानतो. समाजात शोषण आहे पण ते कुठेकुठे आहे ह्याचा शोध घेणे अतिशय कठीण आहे. शोषणरहित समाज असावा, त्यात पूर्ण स्वातंत्र्य असावे, विश्व हे एक कुटुंब असावे हा जो दृष्टिकोण आहे तो अद्भुतरम्यतावादी आहे. पण तो माझ्या मनाची पकड सोडीत नाही.

— शास्त्रीजी, आता दोनच प्रश्न राहिले. तुमच्यावर बौद्धिक प्रभाव टाकणारी माणसे म्हणजे तुमचे गुरुजी, रॉय; आणखी कोण ?

— गांधीजी.

— गांधींचा प्रभाव नैतिक होता की बौद्धिकही होता ?

— बौद्धिकही होता. गांधी हे परंपरेच्या शक्तीचा उपयोग व्हावा असे म्हणणारे, पण तिच्या पलीकडे पहाणारे होते. १९३२ साली येरवडा कारागृहात एक वाद व्हायचा होता, अस्पृश्यतेविषयी. राजेश्वरशास्त्री आणि पंधरा-वीस चांगली शास्त्रीमंडळी आली होती. मी आत गांधीजींजवळ होतो आणि माझे शिष्य आणि मित्र रघुनाथशास्त्री कोकजे माझ्याबरोबर होते. शास्त्रीमंडळींना आत बोलावले तर समयबंध ( वादाच्या अटी ) झाल्याशिवाय आत येणार नाही असा त्यांचा निरोप आला. समयबंधासाठी म्हणून त्यांनी सात-आठ मुद्दे संस्कृत व हिंदीमध्ये लिहून पाठविले. 'हिंदूंच्या देवमंदिरात अस्पृश्यांचा प्रवेश शास्त्रसंमत आहे' ही बाजू आम्ही मांडायची आणि शास्त्रीमंडळींनी विरूद्ध बाजू मांडायची अशी वादाची योजना होती. समयबंधाविषयी शास्त्र्यांचा पहिला मुद्दा असा, की श्रुतिस्मृतिपुराणांचे प्रामाण्य उभयपक्षी मान्य असावे. मी हा मुद्दा मान्य केला. असे सातआठ मुद्दे त्यांनी पाठविले होते. ते सर्व मी मान्य केले. फक्त एकाच शब्दाचा फरक त्यात केला. तो असा : त्यांनी जेथे 'अस्पृश्य' हा शब्द वापरला होता तेथे 'मी आज ज्यांना अस्पृश्य मानण्यात येते ते' असा शब्दप्रयोग घातला. एवढाच फरक केला. गांधींनी विचारले, 'हा फरक तुम्ही का केला ?' मी म्हटले, "आता शास्त्रार्थ व्हायचा आहे. आता हे न्यायालय आहे. समयबंधाला अनुसरून वाद करायचा आहे. तेव्हा अशा स्थितीमध्ये आपले जे म्हणणे म्हणून मांडायचे ते पक्के असले पाहिजे. आता धर्मशास्त्रात अशी काही वाक्ये आहेत की त्यांच्याप्रमाणे अस्पृश्य बहिष्कार्य आहेत.

त्यांच्या मंदिरप्रवेशाला बंदी आहे, अशा अर्थाची अनेक वाक्ये आहेत आणि ती एकत्र घेतली तर जबरदस्त ठरतात. पण धर्मशास्त्रात अस्पृश्य म्हणजे काय हे जे सांगितले आहे ते आजच्या अस्पृश्याला लागू पडत नाही. कारण अस्पृश्याची व्याख्या 'ब्राह्मण स्त्रीच्या ठिकाणी शूद्राकडून जन्माला आलेला तो अस्पृश्य' अशी त्यात केली आहे. ही व्याख्या आज अस्पृश्य मानण्यात येणाऱ्या कोणत्याही जातीला लागू पडत नाही; कारण आज अस्पृश्य मानण्यात येणारी कोणतीही जात स्वतःला आपण संकरज आहोत असे मानीत नाही. ती स्वतःला शुद्धवंशीयच मानते. शास्त्रीपंडित त्यांना संकरज मानतात पण तो पुरावा होऊ शकत नाही. सामान्य माणसे त्यांना संकरज मानीत नाहीत. ते अस्पृश्य मानले गेले आहेत पण ते संकरज नाहीत. त्यांचे तसे वर्णन तुम्ही केले तर त्यांना राग येईल." गांधी म्हणाले, "हे तुमचे म्हणणे अगदी योग्य आहे. पण मग शास्त्राचे जे म्हणणे आहे ते मानायला मी तयार नाही. उच्च असे जे सिद्धान्त आहेत तेच मी मानीन." ही जी गांधीजींची भूमिका आहे ती केवळ नैतिक नाही तर बौद्धिक व नैतिक अशा दोन भूमिकांचा उत्तम संगम तिच्यात आहे. गांधीजींचे म्हणणे ऐकून मला अतिशय आनंद झाला कारण, शास्त्राच्या आधारे अस्पृश्यतानिवारणाचे समर्थन करणे अतिशय कठीण आहे. ही माझी अडचण त्यांच्या ध्यानात आली आहे हे मला कळले. मी गांधीजींना सांगितले की सर्व शास्त्रवचनांचा अर्थ अस्पृश्यता-निवारणाच्या आंदोलनाला अनुकूल ठरेल अशा रीतीने मी लावू शकतो. परंतु असा अर्थ लावणे आवश्यक आहे की नाही याविषयी मला शंका आहे. सांगायची गोष्ट अशी, की मी मघा सांगितलेला बदल केल्या-नंतर शास्त्रीमंडळी वादासाठी आलीच नाही.

— बरे. आणखी कोण तुम्हाला अतिशय उंच वाटलेली, ज्यांच्याशी तुमचा साक्षात् परिचय होता अशी मंडळी ?

— उदा. विश्वनाथ काशिनाथ राजवाडे. हे मला बौद्धिक दृष्टीने फार पक्के वाटले. लोकांना माहीत नाही ते किती पक्के होते. आम्हाला माहिती आहे, कारण ते आमच्या गुरूकडे यायचे. प्राज्ञपाठशालेत त्यांचा महिना महिना मुक्काम असायचा. त्यांची निवासाची सर्व व्यवस्था आम्ही करीत असू. मग चर्चा व्हायच्या. चर्चेमध्ये ते फार मौलिक विचार मांडायचे. भौतिक शास्त्रे हीच खरी शास्त्रे, तेच खरे ज्ञान असे ते म्हणायचे. इतिहास वस्तुवादी असला पाहिजे असे ते मानीत. पोपचा इतिहास लिहिणाऱ्या रांकेप्रमाणे इतिहासाच्या घटना तेवढ्या मांडाव्या, त्या काय बोलायचे ते बोलतील ही इतिहासाची योग्य पद्धती आहे असे ते म्हणत. पश्चिमेत प्रचलित असलेल्या इतिहासाच्या ज्या पद्धती होत्या त्या सर्वांच्या अभ्यासावर आधारलेले, व्यवस्थित ज्ञान त्यांना होते हे लोकांना माहीत नाही. आम्ही जी ऐतिहासिक पद्धती स्वीकारली ती बावीस साली स्वीकारली. तेव्हापासून समाजसुधारणेसाठी भारतीय धर्मग्रंथांकडे ऐतिहासिक पद्धतीने पहावे, मीमांसापद्धतीने म्हणजे समन्वयपद्धतीने त्या सर्वांचा अर्थ एकच आहे असे मानू नये असे आम्ही तेव्हापासून म्हणू लागलो. राजवाड्यांच्या सहवासामध्ये मीमांसापद्धती आणि ऐतिहासिक पद्धती असे दोन शब्द आम्ही तयार केले.

राजवाडे जरा तऱ्हेवाईक होते आणि कोपिष्ठ होते पण आम्हाला ते आवडत असत. ते काहीसे खट्याळ होते. त्यांचे बंधू वैजनाथ काशिनाथ राजवाडे. तेही असे तऱ्हेवाईक होते, 'ऋग्वेदात अशुद्धे संभवतात काय ?' अशा मथळ्याचा लांबलचक निबंध त्यांनी लिहिला आहे. दोन्ही भावांत पाखंडीपण भरपूर होते. त्यांनी निरुक्ताचे उत्कृष्ट भाषांतर-विवरण करणारा हजार पानांचा ग्रंथ प्रसिद्ध केला आहे.

— आजची माणसे तुम्हाला फार ठेंगू वाटत असतील.

— तसे काही नाही. पण त्यांचा फारसा प्रभाव पडत नाही.

— दुसरा माझा प्रश्न असा की, महाराष्ट्राचे वैचारिक जीवन निकोप, बळकट करायला काय करता येईल ? की ही आशाच धरू नये ?

—— आशा धरावी की, 'समाजप्रबोधनपत्रिका', 'तात्पर्य' इ. नियतकालिकांतून चांगले वैचारिक साहित्य प्रकाशित होत असते.

—— शास्त्रीजी, ज्ञानसाधना हीच जीवनातील मुख्य साधना मानून जगण्याची परंपरा खंडित झाल्यासारखी वाटते. तिचे पुनरुज्जीवन कसे करता येईल हा प्रश्न आहे. आपली महाविद्यालये आणि विद्यापीठे ह्या बाबतीत निष्फळ ठरली आहेत.

—— काय आहे, की मला असे वाटते की ओर्तेगा य गासते ( स्पॅनिश तत्त्ववेत्ता ) याने ज्या झुंडीच्या समाजाचे वर्णन केले आहे ती झुंड विद्यापीठात शिरली आहे. विद्यापीठामध्ये विद्येची जी एकांत उपासना होत राहिली पाहिजे, तशी ती होत नाही.

—— वैचारिक दृष्टचा आपल्याला योग्य ती संगत लाभत नाही, ज्यांच्याशी विचारविनिमय करावा ह्या पातळीचे लोक कमी झाले आहेत असे तुम्हाला वाटते की नाही ?

—— सारखे वाटते.

—— ह्या दृष्टीने पहाता, गेल्या पंचवीस-तीस वर्षांत आपल्या बौद्धिक जीवनाची अवनती झाली आहे असे म्हणता येईल. पुढे तुम्ही कोणते काम हाती घेणार आहा ? भारतीय तत्त्वज्ञानाचा किंवा समजा, न्यायदर्शनाचा सांगोपांग इतिहास लिहावा अशी इच्छा तुम्हाला होते का ?

— भारतीय तत्त्वज्ञानाची मांडणी करावी असे मला वाटते. मी जी परवा मोक्षधर्मावर व्याख्याने दिली त्यांचा विस्तार करावा असे मला वाटते. त्यांच्यात एका तऱ्हेने मी नागार्जुनाचा दृष्टिकोण स्वीकारला आहे. पण मला असे आढळून आले आहे की नास्तिक हाही मोक्षधर्मी असू शकतो. म्हणजे जो ईश्वर, पुनर्जन्म मानत नाही असा मोक्षधर्मी नास्तिक उपनिषत्काली होता. ह्याचे थोडे प्रत्यंतर श्वेताश्वतर उपनिषदात मिळते. 'स्वभावमेके कवयो वदन्ति कालं तथाऽन्ये परिमुह्यमाना: ' स्वभाववादी, कालवादी होऊन गेले. नियतिवादी म्हणजे हे विश्वचक्र कुणी परमेश्वर, अदृष्ट चालवीत नाही, तें स्वतःच्या स्वभावानेच चाललेले आहे, त्याच्यामागे अपरिहार्य कालक्रम आहे, कार्यकारणभाव आहे, असे मानणारे विचारवंत वैराग्यशील आणि मोक्षधर्मी होते. ह्याची दोन उदाहरणे– असुरांची उदाहरणे– आढळतात. बळी आणि नमुची. तिसरा प्रल्हाद. प्रल्हाद तर पुढे वैष्णवच केला आहे भागवतात. ह्यातून बोध घ्यायचा तो असा, की विवेकी मनुष्य अमुक एक तत्त्वज्ञान स्वीकारीत असला तरच विरागी होतो असे नाही. पण त्याला तत्त्वज्ञान असावे लागते. वैराग्यासाठी सबंध विश्वाकडे पहाण्याची दृष्टी असावी लागते. पण ती अमुकच दृष्टी असली पाहिजे असे नसते. हे माझे आजचे तत्त्वज्ञान आहे.



सन १९२१



सन १९४४

तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी



सन १९३०



सन १९४२

अनुक्रमणिका



धर्मकोषाचे प्रमुख संपादक, १९३८.

अ. भा. मराठी साहित्य संमेलन, यवतमाळ, १९७३ : संमेलनाला निघण्यापूर्वीचे वृत्तपत्रावलोकन.
















सन १९५३

ब्र. भू. स्वामी केवलानंद सरस्वती यांच्या समवेत, अ. भा. मराठी साहित्य संमेलन, नवी दिल्ली, १९५४.





अ. भा. मराठी साहित्य संमेलन, नवी दिल्ली, १९५४.

प्राज्ञपाठशाळा मंडळ, १९५२.

अनुक्रमणिका











राष्ट्रपतीभवन, नवी दिल्ली, १९५४ :
काकासाहेब गाडगीळ, तर्कतीर्थ,
राष्ट्रपती डॉ. राजेंद्रप्रसाद व स्वामीजी.

अनुक्रमणिका



जैमिनीय सूत्रग्रंथ प्रकाशन, वाई, १९४८ : तर्कतीर्थ, स्वामीजी, बॅ. एम. आर. जयकर व प्रा. न. र. फाटक.



हैद्राबाद : १९५७

अनुक्रमणिका



मुंबई राज्याचे माजी मुख्यमंत्री बाळासाहेब खेर यांच्यासमवेत प्राज्ञपाठशाळा मंडळाचे संचालक मंडळ, वाई, १९४८.



व. भ. कर्णिक, मानवेंद्रनाथ रॉय, श्रीमती एलन रॉय यांच्या समवेत तर्कतीर्थ, कलकत्ता, १९४८.

अनुक्रमणिका



अ. भा. मराठी साहित्य संमेलन,
नवी दिल्ली, १९५४ : स्वागताध्यक्ष
काकासाहेब गाडगीळ यांच्यासमवेत.



तर्कतीर्थांचा अमृतमहोत्सव, वाई, १९७५ : वाईतील ब्रह्मवृंदांसमवेत.



ब्रह्मदेशचे माजी पतप्रधान
उ नू यांच्या समवेत रंगून येथे, १९५५.



ब्र. भू. स्वामी केवलानंद सरस्वती स्मारक मंदिराची कोनशिला बसविताना श्रीमती इंदिराजी, वाई, १९५९.



ब्र. भू. स्वामी केवलानंद सरस्वती स्मारक मंदिराचा कोनशिला समारंभ, वाई, १९५९: श्रीमती इंदिरा गांधी, अध्यक्ष, अ. भा. काँग्रेस, भाषण करताना.

अनुक्रमणिका



शास्त्रीजी व सौ. सत्यवती, १९७०.




चि. वासुदेवसमवेत अमेरिकेस प्रयाण, मुंबई, १९६४.



प्राज्ञपाठशाळा मंडळाचा सरस्वत्युत्सव. वाई, १९६१ : समारोप करताना.



राष्ट्रपती डॉ. राजेंद्रप्रसाद यांच्या हस्ते, उपनिषत्कांड प्रकाशन समारंभ, वाई, १३ डिसेंबर, १९६०.



ज्येष्ठ पत्रकार श्री. श्री. शं. नवरे यांच्या अध्यक्षतेखाली प्राज्ञपाठशाळा मंडळातर्फे तर्कतीर्थांचा अमृतमहोत्सव समारंभ, वाई, १९७५.








मराठी विश्वकोश खंड क्र. ६ व ७ चा प्रकाशन समारंभ, वाई, ९ मे, १९७९ : हस्ते साहित्य अकादेमीचे अध्यक्ष डॉ. उमाशंकर जोशी. शेजारी महाराष्ट्राचे माजी मुख्यमंत्री श्री. शरद पवार.



म. रा. सा. सं. मंडळाची प्रकाशने पाहताना माजी केंद्रीय मंत्री श्री. यशवंतराव चव्हाण व कै. आबासाहेब वीर यांच्या समवेत.

ना. बा. मराठे

# प्राज्ञपाठशाळा आणि शास्त्रीजी

माणूस इतिहास घडवितो की इतिहास माणसाला घडवितो असा एक प्रश्न इतिहासतज्ज्ञांच्या समोर चर्चेला येत असतो. इतिहासतज्ज्ञाच्या वैचारिक प्रणालीला अनुसरून त्याची उलट सुलट उत्तरे दिलेली दिसतात. समर्थ मनुष्य आपल्या कर्तृत्वाने इतिहास घडवितो आणि ऐतिहासिक कार्यकारणभाव लक्षात घेऊन माणसाला त्याच्या कर्तृत्वाचे माप त्याच्या पदरात टाकता येते. मार्क्स, लेनिन, गांधी, नेहरू यांच्या कर्तृत्वाचे मूल्यमापन ऐतिहासिक दृष्टया करता येते. व्यक्तीचे अनुभवविश्व, विचारसामर्थ्य, कल्पनाशक्ती जितकी कार्यक्षम तेवढे यश त्या त्या व्यक्तीच्या पदरात टाकायला इतिहास कचरत नाही. संत ज्ञानेश्वर, नामदेव–एकनाथ, रामदास–तुकाराम यांसारखे प्रवृत्ति-निवृत्तीच्या मागे जाणारे संत-महंत किंवा आधुनिक काळातील लोकमान्य टिळकांपासून विनोबाजींपर्यंतचे ज्वलंत कर्मयोगी यांनी आपापल्या परी स्वकर्तृत्वाने आपापल्या क्षेत्रांत एक निश्चित ठसा उमटवून इतिहासाला चालना देण्यात यश मिळविले आहे. अशा व्यक्तींनी इतिहास घडविला की ऐतिहासिक कार्यकारणभावानुरूप ही कर्तृत्ववान माणसे निपजली याचा वाद तत्त्वज्ञांनी जरूर लढवावा. वस्तुस्थितीत फारसा फरक पडण्याची शक्यता नाही.

### प्राज्ञपाठशाळेच्या पार्श्वभूमीत

पं. लक्ष्मणशास्त्री जोशी यांचे व्यक्तिमत्त्व प्राज्ञपाठशाळेच्या पार्श्वभूमीवर तपासता, त्यांच्या विद्वत्तेचा व कर्तृत्वाचा एक वेगळाच प्रत्यय येऊन जातो. पं. नारायणशास्त्री मराठे यांनी आपल्या गुरुवर्यांच्या –प्रज्ञानंदाच्या–नावे प्राज्ञपाठशाळा सुरू केली, वाढवली, जोपासली. या प्राज्ञपाठशाळेचे लक्ष्मणशास्त्री हे विद्यार्थी. पं. नारायणशास्त्री मराठे यांचे एकमेव नामवंत पट्टशिष्य ! तर्कतीर्थाची पदवी-परीक्षा देण्यासाठी काही काळ त्यांना बनारसला पं. वामाचरण भट्टाचार्य, लक्ष्मणशास्त्री द्रविड यांसारख्या प्रख्यात नैयायिकांकडे पाठविण्यात आले होते. तेथून परत आल्यावर प्रा. पा. शाळेत त्यांची अध्यापक म्हणून नेमणूकही करण्यात आली होती. पं. दिनकरशास्त्री कानडे, पं. महादेवशास्त्री दिवेकर, पं. भय्याशास्त्री वाटवे सारख्यांच्या सहवासात प्रा. पा. शाळेचा व्याप वाढतच राहिला. प्राज्ञपाठशाळेतून बाहेर पडणारा विद्यार्थी समाजकार्यात रस घेणारा, राजकीय दृष्टया पुरोगामी विचारसरणीचा व धार्मिक दृष्टया सुधारक असा बाहेर पडावा या दृष्टीने प्राज्ञपाठशाळेतील अभ्यासक्रम आखण्यात आला होता. पं. नारायणशास्त्री हे कडक शिस्तीचे, प्रखर विद्वत्तेचे अन् जाज्वल्य निष्ठेचे सुधारक विद्वान म्हणून महाराष्ट्राला त्यावेळी ज्ञात होते. याचसाठी अकोल्याला भरलेल्या ब्राह्मणसभेचे अध्यक्षस्थान त्यांचेकडे चालून आले होते. त्यांच्या परिवर्तनवादी विचारसरणीचा परिणाम त्यांच्या सर्वच शिष्यांवर पडला गेल्यास नवल कोणते ? आधुनिक विद्यांचे शिक्षण घेतल्याशिवाय तरणोपाय नाही हे जाणून तत्कालीन कार्यकर्त्यांनी प्राज्ञपाठशाळेला माध्यमिक शिक्षणाची जोड देण्याचा उपक्रम सुरू केला. संस्कृत शिक्षणाबरोबर इंग्रजी शिक्षणाची व्यवस्था करण्यात आली. राष्ट्रीय-शिक्षणाची शाळा म्हणून प्राज्ञपाठशाळेला महाराष्ट्रात मोठे नाव मिळाले. लक्ष्मणशास्त्री, भय्याशास्त्री, दिनकरशास्त्री यांसारख्या हिरीरीच्या तरुण अध्यापकांनी १९३२ च्या असहकार चळवळीत व सत्याग्रहात भाग घेतला. अशा तऱ्हेने शास्त्रीजींचा वैचारिक पिंड शास्त्रीय शिक्षणाबरोबर राजकीय व सामाजिक क्षेत्रातही हळूहळू वाढतच राहिला.

### पं. नारायणशास्त्री–केवलानंद–झाले

मात्र प्राज्ञपाठशाळेच्या कार्यात त्यामुळे थोडासा व्यत्यय आला. माध्यमिक शाळा बंद करावी लागली. पं. नारायणशास्त्री मराठे यांनी संन्यास घेतला; आणि सर्व जबाबदारी लक्ष्मणशास्त्री जोशी यांचेवर येऊन पडली. पण शास्त्रीजी कचरले नाहीत. त्यांनी प्राज्ञपाठशाळेचा संस्कृत शिक्षणाचा कार्यक्रम चालू ठेवला. विश्वस्त मंडळ स्थापन केले. धर्मकोशाचे

सम्पादकपद स्वत:कडे घेतले. काही काळ धर्मकोश कार्यालय पुण्याला नेले आणि पुन: ते वाईला हालविण्यात आले ते आजतागायत. १९६०पर्यंतचा काळ हा शास्त्रीबुवांच्या वैचारिक चिंतनाचा कालखंड समजला पाहिजे. कारण याच कालखंडात त्यांनी मूलगामी लेखन केले. विचारमंथनाला अधिक उजाळा मिळाला तो त्यांचा मानवेन्द्रनाथ रॉय यांचेशी जवळचा संबंध आल्यापासून. पूर्वी 'आनंद मीमांसे'त रमणारे शास्त्रीजी आता 'जडवादा'चे स्वरूप उकलून दाखवू लागले. नागपूरच्या परांजपे व्याख्यानमालेतून 'हिंदुधर्माची समीक्षा' करून त्याचा विकास कसकसा होत गेला याचे विवेचन करू लागले. 'वैदिक संस्कृतीचा विकास' लिहून साहित्य अकादमी दिल्लीकडून ५०००/- रु. चे पारितोषिक मिळवले. मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद देऊन महाराष्ट्राने त्यांना गौरविले. भारत सरकारने भारतीय घटनेचे संस्कृत रूपान्तर करण्यासाठी शास्त्रीजींची नेमणूक केली. आणि 'पद्मविभूषण' ही सन्माननीय पदवीही बहाल केली. महाराष्ट्र सरकारनेही त्यांची कदर करून महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळाचे अध्यक्षपद व विश्वकोशाचे मुख्य संपादकपद देऊन त्यांचा गौरव केला. स्वतः शास्त्रीजी अशा तऱ्हेने व्यक्तिगत उच्चांक गाठीत जातच होते. मात्र परिस्थितीवश प्राज्ञपाठशाळेचे काय झाले ? विद्यार्थी कमी कमी होत जात एक क्षण असा आला, की प्राज्ञपाठशाळेतील शिक्षणकार्य बंद झाले; आणि स्वामिजींनी सुरू केलेला धर्मकोशही अति मंद गतीने सुरू राहिला. पण त्याच बरोबर 'केवलानंद सरस्वती मंदिर' ही गुरूचं नाव कायम ठेवणारी वास्तू उभी करून त्यांनी गुरूवरील निष्ठा अक्षर करून ठेवली. एवढेच काय स्वामी केवलानंदांनी एक हाती लिहून ठेवलेला सात खंडात्मक 'मीमांसाकोश' ही शास्त्रीजींनी प्राज्ञपाठशाळेमार्फत प्रकाशित करून गुरु-ऋण फेडले. स्वामीजींनी अद्वैत सिद्धीचा केलेला मराठी अनुवादही प्रा. पा. शाळेमार्फत प्रकाशित करण्याचे श्रेय मिळविले.

## ग्रंथालये व शास्त्रीजी

प्राज्ञपाठशाळेच्या स्थापनेपासूनच विद्यार्थी व शिक्षक यांच्या उपयोगासाठी ग्रंथ जमा करण्याची योजना कार्यान्वित झाली होती. प्रा. पा. शाळेचे प्रचारक जेथे जेथे जात तेथून ग्रंथालयासाठी पुस्तके, पोथ्या गोळा करीत असत. गेल्या साठ सत्तर वर्षांत संस्कृत-इंग्रजी-हिन्दी-मराठी ग्रंथांचा फार मोठा संग्रह जमा झाला आहे. संस्कृत पोथ्यांचा एक कॅटलॉगही प्रसिद्ध करण्यात आला आहे. विश्वकोशाचे कार्यालय वाईला आल्यापासून त्याचेही एक भव्य व सुसज्ज ग्रंथालय गंगापुरीत तयार झाले आहे. वाईसारख्या ठिकाणी टिळक सार्वजनिक वाचनालय हे एकच ग्रंथालय-वाचनालय उपलब्ध होते, पण आता प्रा.पा. शाळा ग्रंथालय, विश्वकोश ग्रंथालय व वाई कॉलेज ग्रंथालय अशा तीन ग्रंथालयांनी वाईचे वैचारिक वातावरण समृद्ध केले आहे. पण याचे सारे श्रेय पं. लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या मध्यवर्ती नेतृत्वालाच द्यावयाला हवे. कारण प्रा. पा. शाळेचे नेतृत्व करता करतानाच विश्वकोशाची मुहूर्तमेढ त्यांनी लावली आणि वाईचे जीवन सांस्कृतिकदृष्टया संपन्न करण्यास वाईला कॉलेज स्थापन करून ते भरभराटीस आणण्यासही त्यांचेच नेतृत्व कारणी लागले आहे.

## 'नवभारत'

शास्त्रीजींच्या बहुविध कर्तृत्वाची विविध अंगे त्याच प्रा. पा. शाळेच्या भूमीवर स्थिर पाय रोवून विविध स्वरूपांत अवतीर्ण झाली आहेत. एके काळी 'आशा-चित्रा' साप्ताहिकाचे सम्पादन शास्त्रीजींनी केले होते. रॅडिकल ह्यूमॅनिस्टच्या सम्पादक मण्डळात त्यांचे नांव होते. 'क्रिस्ट'मध्येही त्यांचे नांव गोवले गेले होते. परंतु 'नवभारत' त्यांनी प्रा. पा. शाळेमार्फत चालवायला घेतल्यापासून नवभारत मासिकाने साहित्यिक व सांस्कृतिक विषयांचे सर्वांगीण आलोडन करणारे दर्जेदार मासिक म्हणून नाव कमावले. याची सारी प्रेरणा स्वतः शास्त्रीजींचीच आहे.

## प्राज्ञप्रेस

धर्मकोशाच्या कार्यासाठी म्हणून सुरू केलेला प्राज्ञप्रेस हे शास्त्रीजींच्या प्रेरणेचे आणखी एक प्रमुख अंग. वस्तुतः प्रा. पा. शाळेचा आणि प्रेसचा कोणताही तसा संबंध नव्हता. परंतु द्वितीय महायुद्ध सुरू झाल्यापासून जीवनाच्या कक्षा रुंदावत चालल्या हे लक्षात आल्याबरोबर केव्हा ना केव्हा या संस्कृत शिक्षणाला बंद करावे लागेल याचा अंदाज त्यांना लागला होता; आणि धर्मकोशाचे मुद्रण इतर प्रेसकडून करून घेणे दिवसेंदिवस दुष्कर होत चालले आहे याची जाणीव झाल्याबरोबर स्वतःचे मुद्रणालय

हेच त्याच प्रत्यक्ष उत्तर होते अन् ते त्यांनी प्रत्यक्षात आणले. प्राज्ञप्रेसचे सुरुवातीपासून काम पाहणारी अत्यंत विश्वासू मंडळीही त्यांना मिळत गेली म्हणूनच प्राज्ञप्रेस आपल्या भक्कम पायावर उभा राहण्यास समर्थ ठरला. या कार्यी कै. मधुकर साठे यांचे नाव नमूद केल्याशिवाय पुढे जाता येणार नाही. स्वतःचा प्रेस झाल्यांमुळेच शास्त्रीजींना प्रा.पा. शाळेची प्राज्ञप्रकाशने सुरू करता आली. नवभारत-मधून एखादी लेखमाला प्रसिद्ध करून मान्यवान् लेखकाला समाजात मानमान्यता मिळवून देण्याचा उपक्रम यामुळेच त्यांना सुरू करता आला. नवभारत वा प्राज्ञप्रेस याचे कार्य हाती घेण्यात समाजाची प्रत्यक्ष अप्रत्यक्ष सेवा करणे हा स्तुत्य हेतूच होता हे कालाच्या ओघात सिद्ध झाले आहे.

### हातकागद कारखाना

प्रेसचा व्याप उघडल्यानंतर साहाजिकच त्यांचे कागदाकडे लक्ष गेले. गंगापुरीच्या घाटावरील मुरलीधरमंदिराची प्रशस्त जागा प्रा. पा. शाळेला आंदण मिळाली होती. तिचा कागद कारखाना काढण्यास उपयोग करण्यात आला. मात्र हा कागद-कारखाना जितका किफायतशीर व्हायला हवा होता तितका होऊ शकला नाही. त्याची कारणे वेगळी असू शकतील. कागद कारखाना हा स्मॉल स्केल इंडस्ट्रीजच्या धर्तीवर चालवून वेगळ्या धर्तीवर चालवला असता तर तोही अत्यंत किफायतशीरपणे चालू शकला असता. शास्त्रीजी असहकार चळवळीत गेल्यापासून देशी वस्तूंचा वापर करणे, खादीचा वापर करणे हे त्यांचे अंगी जणू बाणूनच गेले. गेली ४०/५० वर्षे शास्त्रीजी स्वतः पूर्ण खादीधारी आहेत. स्वतः स्वामी केवलानंदही पूर्ण खादीधारी होते. त्यांचे भोवती प्रा. पा. शाळेची धुरा वाहाणारे कै. शं. वि. लेले, श्री. विठ्ठलशास्त्री जोशी, कै. शंकरराव जोशी, कै वासुनाना कोनकर, कै. नाना खरे, पं. रंगनाथशास्त्री जोशी हे सारे खादीधारी होते वा आहेत. प्रा. पा. शाळेतून उत्तीर्ण होऊन गेलेले प्रायः सारे विद्यार्थी खादीभक्त आहेत असे विधान केले तर ते अतिशयोक्तीचे होणार नाही. या स्वदेशी चळवळीतूनच राष्ट्रीय वृत्तीची व समाजकार्य करण्याची इच्छा असलेली तळमळीची माणसे प्रा. पा. शाळेने निर्माण केली. शास्त्रीजी हे त्या वृत्तीचे अध्वर्यू होते. मात्र त्यांचे कार्यक्षेत्र केवळ प्रा. पा. शाळा एवढ्यापुरतेच मर्यादित न ठेवता त्या सामाजिक–राजकीय कार्याचा व्याप त्यांनी साऱ्या महाराष्ट्रभर वाढविला. समर्थ रामदास स्वामी हे छत्रपती शिवाजीचे गुरू झाले तर महाराष्ट्राचे एके काळचे मुख्यमंत्री व नंतरचे जबाबदार केन्द्रीय मंत्री झालेले श्री. यशवंतराव चव्हाण यांनी पं. लक्ष्मण-शास्त्री जोशी यांना गुरुपदी मानले. महाराष्ट्रातील काना-कोपऱ्यातून तर्कतीर्थांनी लोकशाही, मानवता-वाद, भारतीय संस्कृती यांसारख्या विषयांवर गेली सतत पन्नास वर्षे समाजहित लोकांसमोर मांडले. एखाद्या भाऊशास्त्र्यांनी गणपतीआळीच्या घाटावरील व्याख्यानांतून शास्त्रीबुवांच्या प्रगतिवादी विचार-सरणीवर जोराची टीका केली असली किंवा आचार्य अत्र्यांनी– ' तर्कतीर्थांना नरकतीर्थ ' म्हणून हिणवले असले तरी त्याचा समाजातील कोणत्याही थराने विशेष रूपात स्वीकार केलेला नाही.

### समग्र ग्रंथ

खऱ्या अर्थाने तर्कतीर्थ हे महाराष्ट्राचे गुरू आहेत. वयाच्या सोळाव्या वर्षापासून ८०व्या वर्षापर्यंत त्यांनी समाजाचे बौद्धिक नेतृत्व केले आहे. बंगाल-सारखा प्रदेश अशा पुरुषांना डोक्यावर घेऊन नाचला असता, पण तुलनात्मकदृष्ट्या महाराष्ट्र पुरुषगुण विज्ञानविमुखच म्हटला पाहिजे. बंगाल-मधील अशा गुणी लोकांच्या समग्रग्रंथांचे संकलन करून ते सर्व लोकांना उपलब्ध करून ठेवण्याची प्रकाशकांना व लोकांनाही सवय आहे. रवीन्द्रनाथ टागोर, अरविंद घोष, शरच्चन्द्र चॅटर्जी, बंकिमचन्द्र यांसारख्या कित्येक समाजहितैषींच्या समग्ररचनावली बंगालमध्ये मिळू शकतात. महाराष्ट्राकडे तोंड वळवून बघायला लागलो तर? वीर सावरकर समग्रग्रंथ निघाले ते केवळ श्री. शं. रा. दाते यांचे वैयक्तिक प्रयत्नामुळे! घरोघरी हिंडून बिचाऱ्यांना त्यांची विक्री करावी लागली. न. चिं केळकर एवढे साहित्य-सम्राट्! त्यांचे समग्रग्रंथ १० खंडांत निघाले; पण त्यांना म्हणावे तितके प्रोत्साहन महाराष्ट्रात मिळाले नाही. गेल्या पंचवीस वर्षांत अशी समग्ररचनावली मराठीतून निघाल्याचे ऐकिवात नाही. मराठी भाषा, साहित्य वा वाङ्मय समृद्ध करावयाचे तर अशा नेतृत्व करणाऱ्या धुरीणांचे विविध जागी विखुरलेले लिखाण एकत्र उपलब्ध करून पुढील पिढीसाठी

जतन करून ठेवणे हे समाजाचे उद्दिष्ट असायला हवे. मागच्या पिढीने काय सांगितले अन् आज काय हवे आहे याची तुलना करायची तर तसे वाङ्मय उपलब्ध करून देणे हे सामाजिक कर्तव्य आहे. तशी जाणीव व जरूरी महाराष्ट्राला अजून शिवलेली दिसत नाही. तर्कतीर्थांनी तसे फुटकळ लिखाण इतके भरपूर केले आहे की त्याची एक 'लेखसूची' करणेही सुलभ नाही. दातेग्रंथसूचीमंडळाने 'कालिक लेख-सूची'चा प्रकल्प हाती घेऊन मराठी वाङ्मयावर फार मोठा उपकार करून ठेवला आहे. त्या लेखसूचीच्या आधारे मूळ लेख शोधून त्याची मुद्रणप्रत तयार करणे हेही एक जटिल काम आहे. ते सारे लेख एकत्रित करून विषयवार विभागणी करून त्यांचे समग्र ग्रंथासाठी सम्पादन करणे हेही एक महत्त्वाचे काम जसे आहे तसे त्याचे प्रकाशन-मुद्रण-वितरण आदी साऱ्या समस्या विचारात घेण्यासारख्या असल्या तरी त्यांचे निवारण करणे अत्यंत आवश्यक आहे.*

## शिष्यपरंपरा तयार केली नाही

प्रज्ञानंदांनी केवलानंदांसारखे निस्सीम शिष्य तयार केले तर स्वामी केवलानंदांनी तर्कतीर्थ हे शिष्योत्तम तयार करून ऋषिऋण फेडले. पण तर्कतीर्थांचे पट्टशिष्य कोण म्हणून पाहू गेल्यास कुणी नजरेस पडत नाही. प्राचीन काळीं शिष्यपरंपरा कायम राहावी म्हणून बुद्धिपुरःसर प्रयत्न केले जात असत. विसाव्या शतकाच्या उत्तरार्धात तिचा लोप झालेला दिसत आहे. तर्कतीर्थांनी प्रत्यक्ष फारच थोड्या विद्यार्थ्यांना पाठ दिले असतील. त्या थोड्या विद्यार्थ्यांत प्रस्तुत लेखकाचा समावेश करायला हवा. शास्त्रीबुवांनी आमचे शांकरभाष्याचे पाठ पुरे करायचे म्हणून सोलापूरला आम्हांला बरोबर नेले आणि सकाळच्या वेळी शांकरभाष्याचे पाठ दिले आणि संध्याकाळी 'लोकशाही' या विषयावरची जाहीर प्रवचने दिली त्यांचेही जणू पाठच आम्हाला मिळाले... ते आमचं भाग्य समजायला हवं...

खरे म्हणजे शिष्यांचा लोंढा आपल्यामागे ठेवण्यासारखा गेल्या पन्नास वर्षांचा कालखंडच नव्हता. ज्या सनातनी पद्धतीत व कडक सनातनी शिस्तीत त्यांचा पहिल्या पंचवीस वर्षांचा काळ गेला, ती सामाजिक परिस्थितीच इतक्या झपाट्याने बदलत राहिली तसे तेही बदलत राहिले. हा बदल 'सुखाय की दुःखाय' हे ठरविण्याचे काम पुढील पिढीतील सामाजिक परिस्थितीचा इतिहास लिहिणाऱ्या तज्ञांसाठी शिल्लक ठेवलेले बरे!

## पुंजी केली नाही

शैक्षणिक कार्य करणाऱ्या महाराष्ट्रातील व्यक्तींकडे पाहिले तर त्यांनी कुठे ना कुठे स्वतःचा बंगला, घर, फ्लॅट् किंवा अपार्टमेंट थाटल्याचे दृश्य दिसते. मात्र लक्ष्मणशास्त्रीजींच्या जीवनाकडे त्रयस्थ दृष्टीने पाहिल्यास त्यांना अशा स्वतंत्र वास्तूची जरूर भासली असे दिसत नाही. केवलानंदांनी प्राज्ञमठाची प्राज्ञपाठशाळा घडवली तर त्या पाठशाळेतील मधुकरी मठाचे शास्त्रीबुवांनी अभ्यागत-गृहात रूपांतर केले. विश्वकोशाच्या कार्यासाठी येणाऱ्या अभ्यागत–संपादकांचे राहाणे, जेवणे आदीची सोय करणे परिस्थितीवश आवश्यकच होते. स्वतःसाठी अगदी एक लहानशी जागा राखून ठेवून इतर भागात अभ्यासिका व खाजगी ग्रंथसंग्रह ठेवून दिला. मनात असते तर शास्त्रीबुवांना एखादा लहानसा बंगला बांधणे अशक्य नव्हते. त्यांच्या सुशील व सुविद्य पत्नीनेही तसा आग्रह कधी धरला नाही. येणाऱ्या जाणाऱ्या अभ्यागतांचे आदरातिथ्य करण्यात तिने स्वतःचे 'सती' हे नाव सार्थ केले, अन् अकस्मात एक दिवस शास्त्रीजींना मागे एकटे ठेवून स्वतःचा कारभार संपवून टाकला. शास्त्रीजींच्या जीवनात स्वामीजी गेले तो पहिला शोक, दुसरा मधुकर साठे याने दिला आणि तिसरा धक्का 'सत्यवती' बाईंनी दिला. मग आता कुणासाठी करावयाचा आहे तो बंगला अन् घर?

जीवनात मिळालेले हे धक्के सहन करण्याची ताकद त्यांचेजवळ आहे. वयाची ८० वर्षे कशी नकळत निघून गेली हे त्यांचे त्यांनाच कळत नाही. वयाला ७५ वर्षे झाल्यावर वाईकरांनी त्यांचा एक भव्य सत्कार-समारंभ घडवून आणला. आपल्या

* य. गो. जोशी : व्यक्ति व कार्य, ज्ञानकोशकार केतकर, र. वा. दिघे यांसारख्या विषयांवर पी. एच्‌डी. चे प्रबंध तयार झाले; मग समग्र ग्रंथ प्रकाशित करण्यास महाराष्ट्रीय प्रकाशक का पुढे येत नाहीत?

अनुक्रमणिका

समारंभातील भाषणात वाईकरांना त्यांनी दिलासा दिला होता की 'मी जरूर आत्मचरित्र लिहिण्याचा प्रयत्न करीन'–मात्र त्याला अजून हात लागला नसावा अशी माझी समजूत आहे.

## विविध समारंभ

प्राज्ञपाठशाळेत दर वर्षी सरस्वत्युत्सव व गुरू प्रज्ञानंदांची पुण्यतिथी करण्याचा परिपाठ गेली साठ-सत्तर वर्षे अव्याहत चालू आहे. वाईकरांना ती एक अपूर्व बौद्धिक मेजवानी असते. दोन-तीन दिवस महाराष्ट्रातील नामवंत विद्वानांना बोलावून प्रचलित विषयावर व्याख्याने केली जातात. या व्याख्यानांना आमंत्रण न मिळालेला विद्वान महाराष्ट्रात क्वचितच असेल. शास्त्रीबुवा स्वत: व्याख्याने द्यावयाला उभ्या महाराष्ट्रात जात; त्यावेळी त्या त्या भागातील विद्वानांना हेरून खास आमंत्रण देऊन त्यांचा सत्कार करणे हाही त्यामागील हेतू असावा. स्वत: विद्वान असणे आणि विद्वान माणसांचा चाहता असणे या दोन्ही दुर्लभ गोष्टी शास्त्रीजींमध्ये पाहावयास मिळतात. गुरुवर्य केवलानंदांना ७५ वर्षे पूर्ण झाल्यावरही शास्त्रीजींनी न्या. मू. गजेंद्रगडकरांना खास बोलावून गुरूंचा भव्य सत्कारसमारंभ आयोजित करून आणला होता. एवढेच काय, त्यावेळी स्वामी केवलानंद गौरव ग्रंथही प्रकाशित करण्यात पुढाकार घेतला होता. १९७७ साली ब्रह्मीभूत केवलानंदांची शताब्दी साजरी करण्यासही शास्त्रीजींनी पुढाकार घेतला. असल्या क्षणी त्यांची गुरुभक्ती उचंबळून आलेली लक्षात भरते.

## मराठी माध्यमामुळे मर्यादा

तर्कतीर्थांना रॉयिस्टांच्या मेळाव्यात नेहमीच अग्रस्थान मिळालेले आहे. स्वत: एम्. एन्. रॉय, एलेन रॉय, बॅ. तारकुंडे, व. भ. कर्णिक, अ. भि. शहा आदी त्यांना फार मानतात. रॉयिस्ट पक्षाचे विसर्जन करण्याचा ठराव कलकत्ता अधिवेशनात करण्यात आला, त्या अधिवेशनाचे अध्यक्षस्थान तर्कतीर्थांनीच भूषविले होते. रॉयिस्ट पक्ष जन्माला आल्यापासून त्याच्या विसर्जनापर्यंत शास्त्रीजी त्या पक्षाशी एकनिष्ठ राहिले. इंग्रजीतून सम्भाषण करण्याचे कौशल्य शास्त्रीजींनी कित्येक वर्षे आत्मसात केले आहे. इंग्रजी ग्रंथांचे वाचन–मनन तर सारखे चालूच असते. मार्क्सचा 'विरोधविकासवाद,' मोठमोठ्या राजकीय पुढाऱ्यांना विशद करून सांगण्याचे चातुर्य त्यांनी अनेक वेळा प्रकट केले आहे. हिंदीच्या आधारे आपले म्हणणे हिंदी व्यक्तीसमोर मांडण्याची तत्परता शास्त्रीजी नेहमीच दाखवतात. संस्कृतमधून चर्चा झाली तर त्यांत त्यांना कधीच अडचण पडली नाही. कारण प्राथमिक शिक्षणानंतर सारी घटपटादी चर्चा संस्कृतच्याच आधारे झाल्याने त्या माध्यमाचा त्यांना पुरेपूर फायदा घेता येतो. एवढे सारे असले तरी त्यांचे प्राय: सारे लेखन मराठी माध्यमातूनच झाले असल्याने महाराष्ट्राबाहेर एका ठराविक राजकीय पक्षाखेरीज शास्त्रीजींचे नाव पोहोचलेले दिसत नाही. डॉ. नगेन्द्रांच्या रसचर्चेवर त्यांनी मूलभूत समीक्षण केले ते मराठीतून. हिंदीपेक्षा साहित्यशास्त्रावर मराठीमध्ये खूपच लिखाण झाले आहे, पण ते हिंदी अभ्यासकांच्या आवाक्याबाहेरचे असते. इंग्रजी माध्यमवाले इतर भाषांतून आलेल्या अभिजात वाङ्मयाकडेही दुर्लक्षच करतात. तीच गत त्या त्या भारतीय भाषांमधूनच रेंगाळणाऱ्या पंडितांची !

## गौरव ग्रंथ

म्हणून मला या निमित्ताने शास्त्रीबुवांच्या चाहात्यांना असे सुचवावेसे वाटते की Tarkateerth : the man and his work असा इंग्रजीतूनच एक मोनोग्राफ तयार करून त्यांच्या कार्याचा गौरवग्रंथरूपात तो प्रसिद्ध करावा. एकोणिसाव्या शतकात महाराष्ट्राचा कायापालट करण्यास ज्यांनी जीवापाड प्रयत्न केले अशा न्या. तेलंग, रानडे आदी समाजसुधारकांची इत्थंभूत माहिती देणारे ग्रंथ इंग्रजीतून उपलब्ध करून देण्याची खबरदारी त्यांच्या चाहात्यांनी घेतली. कॉ. रॉय, डी. डी. कोसंबी, जी. डी. पारीखसारख्या तत्त्वज्ञांची माहितीही आता इंग्रजी माध्यमाद्वारे अभ्यासकांपुढे आली आहे. महाराष्ट्राचे आधुनिक काळातील एक श्रेष्ठ तत्त्वज्ञ म्हणून शास्त्रीजींचा लौकिक आहे. त्याची माहिती इंग्रजी माध्यमाद्वारे सर्व भारतवासीयांना वा भारताबाहेरही असणे इष्ट आहे; ते काम करणे हे त्यांच्या चाहात्यांनी स्वत: होऊन अंगावर घेऊन पुरे करायला हवे.

चिं. ग. काशीकर

# तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी आणि संस्कृत विद्या

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या कर्तृत्वाचे अवलोकन केले असता असे दिसून येते की विश्वसंस्कृतीचा एक स्पृहणीय भाग म्हणून भारतीय संस्कृतीच्या भूत–वर्तमान–भविष्याचे स्वरूप विशद करणे आणि संस्कृतीच्या उन्नतीची चिंता वाहणे हे त्यांनी आपले जीवितकर्तव्य मानले आहे. विश्वसंस्कृतीच्या अभ्यासाची पूर्वतयारी म्हणून त्यांनी प्रथम भारतीय संस्कृतीचा अभ्यास केला. तो करण्यासाठी ती संस्कृती जिच्यामध्ये प्रामुख्याने निविष्ट झाली आहे त्या संस्कृत विद्येचे त्यांनी प्रगाढ अध्ययन केले. त्यांची कुलपरंपराही संस्कृत भाषेच्या आणि विद्येच्या अभ्यासाला अनुकूल होती. हा अभ्यास करण्यासाठी वयाच्या चौदाव्या वर्षी सन १९१४ मध्ये खानदेशातून ते वाईला आले. ब्रह्मश्री नारायणशास्त्री मराठे आणि त्यांची प्राज्ञपाठशाळा यांचे नाव त्यांनी ऐकले होते. पाठशालीय पद्धतीस अनुसरून त्यांचे अध्ययन रीतसर सुरू झाले. पुढे सन १९५२ मध्ये स्वामी केवलानंद सरस्वती (पूर्वाश्रमीचे ब्रह्मश्री नारायणशास्त्री मराठे) यांच्या पंचाहत्तराव्या वाढदिवसानिमित्त मोठा समारंभ वाई येथे झाला, त्या वेळी एक अभिनंदनग्रंथ प्रकाशित करण्यात आला. स्वतः केवलानंदांनी वाई येथे स्वामी प्रज्ञानंदांकडे आणि अन्य गुरुजींकडे प्राचीन पद्धतीनेच वेद आणि शास्त्रे यांचे अध्ययन केले होते. त्या अध्ययनपद्धतीचे चित्र तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री यांनी स्वामीजींसंबंधीच्या प्रदीर्घ निबंधात (पृ. २३–२५) रेखाटले आहे. त्याच पद्धतीने तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री यांचेही अध्ययन प्राज्ञपाठशाळेत झाले. अध्ययन करीत असतानाच अध्यापनही करण्याची आणि त्याच्या द्वारे आपले ज्ञान पक्के करण्याची परिपाठी प्राचीन शिक्षणपद्धतीत होती. तिचे वर्णन लक्ष्मणशास्त्री यांनी पुढीलप्रमाणे केले आहे :

## पारंपरिक संस्कृत अध्ययनपद्धती

"जुन्या शिक्षणपद्धतीत अध्यापन करण्याची योग्यता प्रत्यक्ष अध्ययन चालू असतानाच प्राप्त होते. काव्यव्युत्पत्तीचे व शास्त्रव्युत्पत्तीचे पाठ घेणारे विद्यार्थी जेव्हा घेतलेला पाठ तयार करतात, तेव्हा ते पाठ स्वतःच एकटे बसून जसा तयार करतात तसा एकाच वर्गात अनेक विद्यार्थी असल्यास गुरुजींच्याकडून पाठ ऐकल्यानंतर तो पाठ आळीपाळीने एकमेकांस सांगतात. अधिक बुद्धीचा व अधिक तयारीचा विद्यार्थी गुरूंकडून ऐकलेला पाठ सहाध्यायांस सांगतो. या क्रियेस चिन्तनिका सांगणे असे म्हणतात. ज्या विद्यार्थ्यांची तयारी कमी असते त्यांसही दुसऱ्या किंवा तिसऱ्या चिन्तनिकेच्या वेळेस पाठ सांगण्याची संधी देतात. ज्यांस चिन्तनिका सांगता येत नाही असे ठरते ते विद्यार्थी मागच्या वर्गात ढकलले जातात. पाठ ग्रहण करीत असताना जो काही समजुतीचा घोटाळा राहिला असेल तो चिन्तनिका सांगण्याच्या पद्धतीने नाहीसा होतो, विषय अधिक स्पष्टपणे बिंबतो, प्रतिपादनाची सवय होते, विषयाची उपस्थिती आपोआप राहू लागते. आधुनिक शिक्षणपद्धतीत अशा प्रकारची सोय नसल्यामुळे चांगला अध्यापकवर्ग तयार होणे कठीण आहे. जुन्या शिक्षणपद्धतीतील दुसरा महत्त्वाचा भाग असा की कित्येक वेळा गुरुजींचा पाठ चालू असतानाच बरी तयारी असलेल्या विद्यार्थ्यांना ग्रंथ लावण्यास व प्रतिपादन करण्यास सांगतात. तिसरा विशेष असा की सुटीच्या दिवशी किंवा धार्मिक उत्सवप्रसंगी अधिक प्रगत झालेल्या विद्यार्थ्यांनी काव्य, न्याय, व्याकरण, वेदान्त, पुराण इत्यादी स्वतःच्या विषयाचा काही भाग सांगावा याकरिता सभा भरवितात. या सभेत अधिक प्रावीण्य प्राप्त झालेल्या विद्यार्थ्यांचे गुरुजनांच्या अध्यक्षतेखाली वादविवाद होतात. विषय






अनुक्रमणिका

वादविवादाचा नसल्यास प्रवचन व व्याख्यान करावयास लावतात. विद्यार्थ्यांची हीच परीक्षा होय. विद्वत्सभेतील प्रतिपादन व वादविवाद हीच खरीखुरी परीक्षा समजली जात असे. प्रसंगविशेषी त्यातच समाधान पावलेले पंडित ऐकमत्याने पदवीदानही करीत.

"प्राचीन संस्कृत विद्येच्या परंपरेत बौद्धिक दृष्टया विद्यार्थी अधिक सकस तयार होत असे. तर्क व व्याकरण यांचे नियम सारखे उपस्थित ठेवून वापरण्याची पद्धत त्यात आहे. तर्कनियम व व्याकरण-नियम इतर विषयांचे प्रतिपादन किंवा चर्चा करीत असतासुद्धा उपस्थित ठेवावे लागतात. तर्कविषयक व व्याकरणविषयक प्रश्न इतर विषयांतही उपस्थित केले जातात. पूर्वोत्तरपक्षपद्धती ग्रंथ लावताना वापरावी लागते. त्यामुळे अस्पष्टता, विसंगती आणि गोंधळ हे दोष नाहीसे होतात. विषय अधिक तोलून मोजून मापून तपासण्याची सवय लागते. विषय पूर्वापरसंगती सिद्ध करण्याकरिता संपूर्णपणे उपस्थित किंवा कंठस्थ ठेवण्याची जबाबदारी बाळगावी लागते."

प्राचीन अध्ययनपद्धतीमध्ये हे गुण आहेत खरे, परंतु त्याचबरोबर काही दोषही संभवतात. त्यांचेही दिग्दर्शन त्याचबरोबर करण्यात आले आहे:

"एवढे मात्र ध्यानात ठेवले पाहिजे की रूक्षता, वावदूकता, गर्व आणि दुसऱ्या सद्गृहस्थाबद्दलच्या खऱ्या आदराचा अभाव हे दोष मात्र जुन्या पंडिती संप्रदायात उत्पन्न होण्याचा धोका अधिक असतो. परंतु वरिष्ठ पंडित व गुरुजन यांचा धाक असल्यामुळे या दोषांना काहीशी मुरड पडते......दुसरे असे की या जुन्या पंडिती परंपरेत शब्दप्रामाण्य आणि रूढीचे प्रामाण्य जबरदस्त असल्यामुळे शब्दप्रामाण्याच्या मर्यादेच्या बाहेर बौद्धिक वाढ होत नाही. ग्रंथांचे प्रामाण्य बाजूस सारून अनुभव, निरीक्षण व चिकित्सकता या तीन अंगांची सम प्रमाणात वाढ होत नाही, परंपरेवरील अंधश्रद्धेमुळे ज्ञानाची अनुभवनिष्ठ प्रगती होत नाही. पांडित्याला वस्तुनिरीक्षणाची आणि अनुभवाची जोड देण्याची वासना नसते. त्यामुळे परंपरेचे समर्थन करताना शुष्क पांडित्याची आणि छलवादाची खोड जडते. तिसरे असे की, धार्मिक परंपरेवर निष्ठा असूनही उच्च दर्जाची धार्मिकता आणि जड व भोळसट रूढीतील कर्मठपणा यांच्यातला विवेकपूर्ण फरक समजत नसल्यामुळे उदार, व्यापक व सहानुभूतिपूर्ण धार्मिक भावना वाढीस लागलेल्या नसतात. खराखुरा धार्मिक जिव्हाळा आणि मानवी सहानुभूती यांचा ओलावा हृदयात उत्पन्न होत नाही. हे दोष परंपरागत पंडिती पद्धतीचे आहेत."

पंडित लक्ष्मणशास्त्री या दोषांपासून सर्वस्वी अलिप्त राहिले. याची कारणे दोन. पहिले असे, की जी अध्ययनपरंपरा त्यांना लाभली तिच्यामध्ये हे दोष नव्हते. स्वतः केवलानंदांच्या अध्ययनपरंपरेसंबंधी लिहिताना त्यांनी म्हटले आहे– "परंपरागत पद्धतीतील काही परंपरा धार्मिक दृष्टीने व्यापक, निष्ठापूर्ण आणि आध्यात्मिक वृत्तीस प्राधान्य देणाऱ्या आणि पढिक पांडित्यास मर्यादित महत्त्व देणाऱ्या आहेत. त्यांत वरील दोष उत्पन्न होत नाहीत. विशेषतः वावदूकपणाला आणि रूढ शब्द-पांडित्याला गर्ह्य समजतात. आमच्या गुरुवर्यांना लाभलेली परंपरा पांडित्यापेक्षा आध्यात्मिक निष्ठेला महत्त्व देणारी होती. शब्दप्रामाण्यापेक्षा सारासार-विचाराचे अधिक महत्त्व मानणारी होती." दुसरे कारण असे की या दोषांचा स्पर्शही जिला नाही अशा आधुनिक शिक्षणपद्धतीचा अवलंब प्राचीन पद्धतीने शिक्षण पूर्ण केल्यावर स्वतः लक्ष्मणशास्त्री यांनीच स्वतंत्र रीतीने केला. इंग्रजी भाषा ते शिकले आणि त्या भाषेत प्राचीन भारतीय विद्येसंबंधी लिहिले गेलेले सर्व वाङ्मय त्यांनी नजरेखाली घातले. एवढेच नव्हे तर धर्मशास्त्रात अंतर्भूत असलेल्या समाजशास्त्राचा आधुनिक व्यापक भूमिकेवरून अभ्यास करण्याच्या हेतूने त्यांनी ऐतिहासिक भौतिकवादासंबंधीचेही ग्रंथ वाचले.

## परिवर्तनशील धर्म

लक्ष्मणशास्त्री यांनी प्राचीन अध्ययनपद्धतीला अनुसरून शास्त्रव्युत्पत्तीचा अभ्यास केला. धर्मशास्त्र, न्याय, वेदान्त, पूर्वमीमांसा इत्यादी शास्त्रांचे सखोल अध्ययन त्यांनी केले. त्यांचे अध्ययन पूर्ण झाले त्या सुमारास शुद्धिसंघटन आणि अस्पृश्योद्धार या चळवळींना विशेष जोर चढला होता. ज्या परंपरेत त्यांचे अध्ययन झाले तिला अनुसरून या विषयासंबंधी त्यांचा दृष्टिकोन उदार होता. स्मृती आणि निबंध यांतील वचनांचा

अर्थ समन्वयसिद्धान्ताला अनुसरून करून परधर्मात गेलेल्यांचे शुद्धीकरण आणि अस्पृश्यता या दोन विषयांसंबंधीची मते वाराणसी येथील सनातन-धर्ममहासभेच्या प्रवर्तकांनी मांडली होती. त्यासंबंधी पुढील अधिवेशनात व्हावयाच्या चर्चेसाठी प्रतिवाद-स्वरूपाचा 'शुद्धिसर्वस्वम्' या नावाचा संस्कृत निबंध सन १९२८ मध्ये लक्ष्मणशास्त्री यांनी वाईमध्ये प्रसिद्ध केला. धर्मशास्त्र आणि लोकसंग्रह ही जी धर्मज्ञानासंबंधीची दोन प्रमाणे त्यांचा समन्वय करून शास्त्रविप्लवही होऊ नये आणि समाजहानिही होऊ नये यासाठी सांप्रतच्या विपत्ती लक्षात घेऊन पंडितांनी विचार करावा, अशी प्रस्तावना करून लक्ष्मणशास्त्री यांनी वरील निबंधात शुद्धीचा पुरस्कार केला. चण्डाल या शब्दाच्या लक्षणाचा ऊहापोह करून, सार्वजनिक व्यवहारात इतरधर्मीयांच्याबाबतीतही आपण अस्पृश्यता पाळीत नाही मग स्वधर्मीयांसंबंधी ती पाळण्यात कोणते औचित्य आहे, असा मुद्दाही त्यांनी आपल्या निबंधात मांडला.

### धर्मकोश

ब्रह्मश्री नारायणशास्त्री मराठे यांनी सन १९२५ मध्ये 'धर्मकोश' या नावाची धर्मशास्त्रीय वचनांचा कालक्रमाने संग्रह करणारी मोठी योजना आखली. धर्म या संकल्पनेमध्ये वर्णाश्रमधर्म, व्यवहार, राजनीति, श्रौतकर्म, प्रायश्चित्त, तत्त्वज्ञान इत्यादी अनेक विषय अंतर्भूत होतात. या प्रत्येक विषयाचे एकेक काण्ड कल्पून त्यातील विभागांना आणि उपविभागांना अनुसरून वेदांपासून निबंधग्रंथांपर्यंतच्या वाङ्मयातून विषयवार वचनांचा संग्रह असे त्याचे स्वरूप निश्चित करण्यात आले. सन १९३१ मध्ये नारायणशास्त्री मराठे यांनी संन्यासदीक्षा घेतली. तेथपर्यंत धर्मकोशाचे बरेचसे प्राथमिक काम त्यांनी उरकले. वेदवचनांचा विषय विभागानुसार संग्रह केला, निबंधग्रंथांतील स्मृतिवचनांचा संग्रह केला, आणि श्लोकार्धसूचीही तयार केली. सन १९३३ मध्ये लक्ष्मणशास्त्री यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळाच्या वतीने धर्मकोशाची योजना स्वीकारली आणि काम पुढे चालू केले. धर्मकोशाची रचना ऐतिहासिक दृष्टीने करण्यात आली आहे. भारतीय संस्कृतीच्या यथायोग्य आकलनासाठी धर्मशास्त्राच्या इतिहासाचे अवलोकन आवश्यक आहे. त्यासाठी साधनांचा संग्रह हे धर्मकोशाचे स्वरूप आहे. अमुद्रित ग्रंथांतीलही वचनांत संग्रह यामध्ये करण्यात आला आहे. मुद्रित ग्रंथांतील वचनांत अशुद्धता आढळल्यास साधार पाठशुद्धी करण्याचे प्रयत्नही केले गेले आहेत. धर्मकोशाची रचना ऐतिहासिक क्रमाने केली तरी संग्रहाचा क्रम आणि पद्धती ही मीमांसापद्धतीने अध्ययन करणाऱ्यालाही सहायक ठरतील असे धर्मकोशाच्या संपादकांनी म्हटले आहे. एकूण योजनेपैकी व्यवहारकाण्ड, संस्कारकाण्ड, राजनीतिकाण्ड, उपनिषत्काण्ड इ. छापून प्रसिद्ध झाली आहेत. उर्वरित काम चालू आहे. एकेक कांड अनेक भागांत पुरे झाले आहे.

उपनिषत्काण्डात एकोणीस महत्त्वाची उपनिषदे सभाष्य छापली आहेत. या कांडाच्या एकूण चार भागांपैकी पहिल्या भागात मन्त्रब्राह्मणोपनिषद् समाविष्ट आहे. उपनिषदांतील कल्पना आणि विचार त्या त्या ऋषींना एकाएकी स्फुरलेले नाहीत. त्यांना वेदांतील मंत्र, ब्राह्मणे आणि आरण्यके यांची पृष्ठभूमी आहे. उपनिषदांतील विचारांचे मूळ ज्या वेदमंत्रांत आणि ब्राह्मणवचनांत आहे असे लक्ष्मणशास्त्री यांना वाटले अशांचा संग्रह त्यांनी मन्त्रब्राह्मणोपनिषद् या नावाने केला आहे. अग्न्यादिदेवतारूप परमात्मा, सृष्टी, शरीर, जीवगती, धर्मतत्त्व, श्रेयस् आणि प्रणव या विभागांत अशा वचनांचा संग्रह केला आहे. वेदवचनांचा उपनिषद्विचारांशी संबंध दाखविताना त्या त्या वचनाचा जो अर्थ संपादकांनी केला आहे त्यासंबंधी मतभेद होऊ शकतील असे स्वतः लक्ष्मणशास्त्री यांनीच म्हटले आहे. या संग्रहातील वाक्यांचा आणि शब्दांचा कोश (इंग्रजी अर्थासह) अकारादिक्रमाने तयार करून जोडला आहे. या भागाला विस्तृत इंग्रजी प्रस्तावना जोडलेली आहे. आणि औपनिषद् तत्त्वज्ञानाच्या मध्यवर्ती कल्पनांचा परामर्श तीमध्ये घेण्यात आला आहे. औपनिषद तत्त्वज्ञानाचा उगम आणि विकास प्राचीन श्रौतधर्मातून झाला असे खुद्द उपनिषदे, पुराणे आणि मण्डनमिश्र, रामानुज यांच्यासारखे आचार्य यांच्या प्रतिपादनांतून स्पष्टपणे दिसून येते. परंतु भारतीय तत्त्वज्ञानाचा इतिहास लिहिणाऱ्या आधुनिक भारतीय विद्वानांचे असे मत दिसते, की

अनुक्रमणिका

उपनिषदांतील विचारांचा शोध घेण्यासाठी ब्राह्मण-ग्रंथांतील कर्मकांडाकडे धाव घेण्याची मुळीच आवश्यकता नाही. शतपथ ब्राह्मणातील अग्निचयन-कांडात तत्त्वज्ञानाचा उगम झालेला आहे असे एगलिंग्ने शतपथ ब्राह्मणाच्या इंग्रजी अनुवादाच्या प्रस्तावनेत स्पष्टपणे नमूद केलेले आहे. तथापि आमचे विद्वान या विधानाची दखलही घेत नाहीत ही खेदाची गोष्ट आहे, असे लक्ष्मणशास्त्री यांनी प्रस्तावनेत नमूद केले आहे. ही प्रस्तावना अभ्यसनीय आहे.

धर्मकोशाचे संस्कारकांड छापले गेले आहे त्यामध्येही काही विशेष आहे. विवाहसंस्कारामध्ये वधुवरांच्या गोत्रप्रवरांचा विचार करावा लागतो. उपलब्ध गोत्रप्रवरविषयक ग्रंथांचा साक्षेपाने अभ्यास करून गोत्रप्रवरांचा संग्रह चिकित्सापूर्ण पद्धतीने तयार करून विवाहप्रकरणात छापला आहे.

धर्मकोशाची ही योजना अतिशय प्रचंड आहे. ऐतिहासिक पद्धतीला अनुसरून धर्मकोशाची रचना करावी हा स्वामीजींच्या मनात आलेला विचार निःसंशय त्यांच्या स्वतंत्र बुद्धीचा द्योतक आहे. तेच सूत्र लक्ष्मणशास्त्री यांनी पुढे चालविले. स्वामीजींच्या प्रेरणेने तत्त्वनिष्ठ धर्मपरिवर्तनवादी पक्षाचे आणि धर्मनिर्णय मंडळाचे जे कार्य महाराष्ट्रात झाले आणि आजही थोडेबहुत चालू आहे त्याचा एक सिद्धान्त असा आहे की वेद हे पौरुषेय आहेत. ऐतिहासिक पद्धतीचा आश्रय करणारे चिकित्सक विद्वान त्याच मताचे आहेत यात आश्चर्य नाही.

### हिंदुधर्माची समीक्षा

प्रायः सन १९३३ नंतरच्या पाचसात वर्षांत लक्ष्मणशास्त्री यांच्या बुद्धीने एक नवी आणि विलक्षण झेप घेतली. इंग्रजी भाषेचे ज्ञान आत्मसात करून आधुनिक समाजशास्त्र आणि कार्ल मार्क्सचा ऐतिहासिक भौतिकवाद यांवरील ग्रंथांचा चांगला परिचय करून घेतला. मार्क्सवादी विवेचनपद्धतीचा त्यांच्यावर विशेष प्रभाव पडला, आणि त्या दृष्टिकोनातून हिंदुधर्माविषयीची आपली मते त्यांनी बनविली. सन १९४० मध्ये नागपूर विश्वविद्यालयात 'हिंदुधर्माची समीक्षा' या विषयावर तीन व्याख्यानांची रा. ब. परांजपे व्याख्यानमाला त्यांनी गुंफली ती याच दृष्टिकोनातून. त्यांच्या व्याख्यानांचे विषय 'धर्मसमीक्षेची भूमिका', 'धर्मलक्षण व धर्मप्रमाण' आणि 'हिंदुधर्माचे स्वरूप' असे होते. प्रास्ताविकात त्यांनी म्हटले, "धर्म ही मानवजातीची अफू आहे या विचाराने प्रेरित होऊन हे समीक्षण केलेले नाही; तर धर्माची समीक्षाच सर्व समीक्षेचा खरा प्रारंभ होय या विचाराची प्रेरणा या समीक्षेच्या मुळाशी आहे."

पहिल्या व्याख्यानात धर्मसमीक्षेसंबंधी आणि धर्मविकाससंबंधी सामान्य तत्त्वे, समाजपरिवर्तनासंबंधी सामान्य सिद्धान्त, संस्कृतीची मीमांसा व मानवजातिशास्त्रज्ञांच्या धर्मोपपत्ती यांची मांडणी केली आहे. धर्माची व्याख्या व धर्माच्या ज्ञानाचे साधन यासंबंधी प्राचीन भारतीय तत्त्ववेत्त्यांनी केलेल्या सूक्ष्म व मूलगामी चर्चेचा परामर्श दुसऱ्या व्याख्यानात घेतला आहे. तिसऱ्या व्याख्यानात हिंदुधर्माच्या सामान्य व विशेष स्वरूपाची, अंगोपांगांची विविध व विचित्र शाखोपशाखांची, ऐतिहासिक क्रमाची आणि ऐतिहासिक कार्यकारणपरंपरेची मांडणी केली आहे.

पहिल्या व्याख्यानाच्या समारोपात त्यांनी म्हटले आहे : "धार्मिक मनःस्थिति ही व्यक्तीच्या जीवितावर गूढ रीतीने सत्ता चालविणाऱ्या सामाजीक शक्तीचे विकृत प्रतिबिंब होय. समाजवादी क्रांतीनंतरच्या स्थितीत बिंबच नाही तर प्रतिबिंब कोठून राहणार ? ... धर्म ज्या तऱ्हेच्या विकृत व विपर्यस्त कल्पनांतून उत्पन्न होतो त्या तऱ्हेच्या कल्पना करण्यास आता जागा राहिली नाही. जीवनावर नियंत्रण करणाऱ्या सामाजिक शक्तीचे गूढ पूर्ण उकलले आहे. त्याप्रमाणे अमलबजावणी केल्यास धार्मिक मनोभावनाच उत्पन्न होणार नाही. धर्मापेक्षा श्रेष्ठ भावना व धर्मापेक्षा उच्च दर्जाची मानसिक संस्कृती समाजात अवतरेल." (पृ. ७५) हिंदुधर्मशास्त्रानुसार समाजधारणेस ईश्वर, स्वर्ग, नरक, आत्मा, पारलौकिक जीवन इत्यादी वस्तूंच्या कल्पनेची आवश्यकता आहे. या धार्मिक मूल्यांत अनेक दोष असल्याचे समीक्षेत दाखविण्यात आले आहे. "पहिला दोष असा की ईश्वरश्रद्धा व अमरत्वभावना या अलौकिक व पारलौकिक मूल्यांपेक्षा अगदी निराळ्या मूल्यांच्या म्हणजे केवळ ऐहिक मूल्यांच्या योगाने इतिहासातील फार मोठ्या घटना घडून आल्या आहेत व येत आहेत." (पृ. २२३)

"दुसरा दोष असा की, विशिष्ट देशकालमर्यादेत महत्त्व पावलेल्या विधिनिषेधांस, भावनांस, आचारांस, विचारांस किंवा संस्थांस धर्मवाद शाश्वत मूल्य अर्पण करतो, त्यांना शाश्वत अलौकिक शक्तींचा पाठिंबा निर्माण करतो ... त्याचा परिणाम असा होतो की विशिष्ट देशकाली व विशिष्ट परिस्थितीतच काही आचारविचारांना जे महत्त्व असते ते परिस्थिती बदलल्यावर नष्ट होते आणि त्यांची अडगळ बनते. धर्ममूल्यांमुळे ही अडगळ प्रगतीच्या मार्गात अडथळा उत्पन्न करते." (पृ. २२५–२२६). "धर्ममूल्यांचा तिसरा दोष असा की, धर्मसंस्थेवर सत्ताधारी वर्गाच्या लोकांचा प्रभाव पडतो, व ते त्या धर्ममूल्यांचा व धार्मिक विचारसरणीचा उपयोग सामान्य जनतेला गुलामगिरीत व अज्ञानात ठेवण्याकडे करतात." ( पृ.२२६ ).

या विचारसरणीबरोबरच हिंदुधर्माचे चिकित्सापूर्ण मूल्यमापन केलेलेही समीक्षेत आढळते. उदाहरणार्थ "कुमारिलभट्टांनी शब्दप्रामाण्याच्या आधारे धर्मशास्त्रनिर्णयाची पद्धति बसविली ती सर्वमान्य झाली. त्यांच्या मते वेदस्मृतिपुराणे स्वतःप्रमाण आहेत. कुमारिलांनी श्रौतस्मार्त प्रवृत्तिवादाचा पुरस्कार केला. कुमारिलभट्टांना वैदिक प्रवृत्तिधर्माचे, यज्ञमार्गाचे व स्मार्त गृहस्थाश्रमधर्माचे पुनरुज्जीवन करून संन्यास व निवृत्तिमार्ग यांचे निराकरण करावयाचे होते; ते त्यांना साधले नाही. शंकराचार्यांच्या दिग्विजयाने कुमारिलभट्टांची मनीषा विफल झाली. शंकराचार्यांनी कुमारिलांच्या शब्दप्रामाण्याचा स्वीकार केला." ( पृ. २०६ ). "विश्वविषयक किंवा वस्तुविषयक प्रत्येक उपपत्ति विशिष्ट मर्यादेबाहेर तर्कदुष्ट होते हे त्यांनी ( शंकराचार्यांनी ) सिद्ध करून सगळ्या विचारमार्गांची बौद्धिक अगतिकता सिद्ध केली. सर्व तात्त्विक वादांचे अनुपपन्नत्व तर्कदृष्टया त्यांनी साधले. स्वतःचा ब्रह्मवादही तर्कवादाने मानवबुद्धीने निश्चित होऊ शकत नाही असे दाखविले." ( पृ. २०७ ). समीक्षेचा समारोप लक्ष्मणशास्त्री यांनी पुढीलप्रमाणे केला आहे– "मध्यान्हीच्या सूर्याप्रमाणे देदीप्यमान असलेले नवीन सामाजिक विश्व निर्माण करणे हेच मानवशक्तीचे यापुढील साध्य आहे. आता धर्मसंस्थेपेक्षा उन्नततर असा सामाजिक संस्था निर्माण होऊ लागल्या आहेत. पूर्वीच्या धर्मसंस्थेस माहीत नसलेल्या सामाजिक व्यवस्थेची गरज आता उत्पन्न झाली आहे. ... वरील नूतन ध्येये आपल्या परंपरेचीच नवी परिणति आहे. व्यासाने मानवव्यवहाराला, लोकव्यवस्थेला व समाजधारणेला मुख्यत्व देऊन शाश्वत नैतिक मूल्यांनाही सापेक्ष ठरविले; बुद्धाने मानव्याला मध्यवर्ती स्थान दिले; वेदांपासून तो शंकराचार्यांपर्यंत तत्त्ववेत्त्यांनी सत्याच्या नित्यसमीक्षेचा व संशोधनाचा अग्नि जागृत ठेविला. हिंदुधर्माचा हा थोर वारसा भारतीयांना मिळालेला आहे; तो न सोडता भूतकालात कधीही निर्माण करता आले नाही असे उच्च सामाजिक जीवन निर्माण करण्याची जबाबदारी त्यांच्यावर आहे." (पृ. २३३–२३४).

## वैदिक संस्कृतीचा विकास

नागपूर विश्वविद्यालयात व्याख्याने दिल्यानंतर काही वर्षांनी म्हणजे सन १९४९ मध्ये श्रीमंत नारायणराव बाबासाहेब घोरपडे, इचलकरंजी व्याख्यानमालेत 'वैदिक संस्कृतीचा विकास' या विषयावर लक्ष्मणशास्त्री यांनी पुणे येथे सहा व्याख्याने दिली. ती सन १९५१ मध्ये प्रकाशित झाली. या पुस्तकाची सुधारून वाढविलेली दुसरी आवृत्ती सन १९७२ मध्ये प्रकाशित झाली. या सहा व्याख्यानांचे विषय असे होते– १) वेदकालीन संस्कृती, २) वेदांची तार्किक प्रज्ञेत परिणती ३) वैदिकांची कुटुंबसंस्था व समाजसंस्था ४) इतिहासपुराणांची व रामायणाची संस्कृती ५) बौद्ध व जैन यांचा धर्मविजय, आणि ६) आधुनिक भारतातील सांस्कृतिक आंदोलन. हिंदुधर्माची समीक्षा हे पहिले पुस्तक आणि आताचे नवे पुस्तक यात केलेल्या संस्कृतीच्या मीमांसेत फरक आहे. तो लक्ष्मणशास्त्री यांनी आपल्या प्रस्तावनेत ( दुसरी आवृत्ती पृ. ४ ) पुढीलप्रमाणे व्यक्त केला आहे :

"भारतीय संस्कृतीची टीकाप्रधान मीमांसा आम्ही 'हिंदुधर्माची समीक्षा' या पुस्तकात पूर्वी केली होती. त्यातील दृष्टिकोन व या निबंधातील दृष्टिकोन यात फरक आहे. 'हिंदुधर्माची समीक्षा' या पुस्तकावर मार्क्सवादी विवेचनपद्धतीचा प्रभाव अधिक आहे. वर्गविग्रहाच्या तत्त्वाची पकड त्यावर अधिक आहे. मानवी विचारांना भौतिक वा आर्थिक


अनुक्रमणिका

उत्पादनपद्धतीच्या मर्यादांचे बंधन वाजवीपेक्षा अधिक प्रमाणात त्यात मानले आहे. उलट या निबंधात आध्यात्मिक किंवा वैचारिक स्थिर मूल्यांची शक्ती समाजातील भौतिक प्रवृत्तीवरही आधिपत्य गाजवू शकते या कल्पनेला महत्त्व दिले आहे. आर्थिक उत्पादनपद्धतीत अनेक स्थित्यंतरे झाली तरी युगानुयुगे आपले सामर्थ्य किंवा प्रभुत्व टिकविणारीही काही मानसिक मूल्ये असू शकतात, या तत्त्वाची जाणीव ठेवून हा निबंध लिहिला आहे. परंतु 'हिंदुधर्माची समीक्षा' या पुस्तकातील हिंदुधर्माचे ऐतिहासिक चिन्तन व मूल्यमापन करीत असता सांगितलेले अनेक निर्णय संस्कृतिविवेचनास व संस्कृतीच्या गतिमत्तेचा अर्थ ठरविण्यास मदत करतील असा आमचा भरवसा आहे."

पहिले पुस्तक आणि दुसरे पुस्तक यांच्या आशयात बराच फरक आहे हे ग्रंथकाराने स्वत: नमूद केले आहे. दोन्ही पुस्तकांच्या लेखनकालामध्ये सात-आठ वर्षांचे अंतर आहे. दृष्टिकोणांमध्ये हा फरक कसा झाला याचे स्पष्टीकरण लक्ष्मणशास्त्री यांनी कोठे केलेले दिसत नाही. विश्वसंस्कृतीच्या संदर्भात भारतीय संस्कृतीच्या इतिहासाचे जे मननचिंतन त्यांनी मधल्या काळात केले त्याचे हे फलित असावे.

लक्ष्मणशास्त्री यांच्या संस्कृत वाङ्मयाच्या व्यासंगाच्या व्याप्तीची कल्पना "वैदिक संस्कृतीचा विकास" या त्यांच्या ग्रंथावरून चांगली येते. वैदिक वाङ्मय, दर्शने, महाकाव्ये, शास्त्रे, स्मृती, पुराणे, बौद्ध व जैन साहित्य इत्यादी सर्व शाखांतील संस्कृत साहित्याचा त्यांनी आपल्या विवेचनात पुरेपूर उपयोग केला आहे. संस्कृत साहित्याची अशी एकही शाखा नाही की जिला त्यांनी स्पर्श केलेला नाही. त्यांच्या ग्रंथात संदर्भांची रेलचेल आढळणार नाही, परंतु विविध विभागातील साहित्याचा परिपाक त्यांच्या चिकित्सापूर्ण विवेचनात आढळतो. भारतीय संस्कृतीला वेदपूर्व द्रविडादी भारतीय लोकसमूहांच्या संस्कृतीचा खोल पाया आहे; असे असताही भारतीय संस्कृती वैदिक संस्कृतीचा विकास होय, असे लक्ष्मणशास्त्री यांनी म्हटले आहे. कारण "भारतीय संस्कृतीच्या विकासास प्राचीनकाळी मुख्य प्रेरणा वैदिक संस्कृतीपासून म्हणजे तिची भाषा व साहित्य यांच्यापासूनच मिळाली," असे त्यांनी द्वितीयावृत्तीच्या प्रस्तावनेत (पृ. १३) म्हटले आहे. "वैदिक संस्कृती आज विश्वसंस्कृतीची भागीदार बनली आहे. विश्वसंस्कृतीचा अधिक पूरक व पोषक असा भाग ती बनावी," म्हणून ही समीक्षा त्यांनी आरंभली आहे.

पहिल्या व्याख्यानात वेदपूर्व संस्कृतीचा संक्षिप्त आढावा घेऊन वैदिक वाङ्मयाच्या निरनिराळ्या शाखांची माहिती नमूद केली आहे आणि ऋग्वेदादी ग्रंथांतील महत्त्वाच्या विषयांचे दिग्दर्शन केले आहे. "वैदिक संस्कृती ही अतिप्राचीन संस्कृतींमधील एक संस्कृती आहे; परंतु त्या इतर संस्कृतींमध्ये न आढळणारे विश्वसौंदर्याचे दर्शन हे हिचे एक विलक्षण वैशिष्ट्य आहे. वैदिकांच्याइतका विश्वसौंदर्याचा उत्कट प्रत्यय इतरत्र कोठेही दिसत नाही. हा असा प्रत्यय हे सुसंस्कृत मानवसमाजाचे एक महत्त्वाचे लक्षण आहे. हे लक्षण आदिम समाजांमध्ये असू शकत नाही; विश्वशक्तीच्या भयाची बाधा त्या समाजांना स्वाभाविकपणे झालेली असते, त्या भयबाधेतून मुक्त झाल्याशिवाय निसर्गाच्या दिव्य सौंदर्याचा प्रत्यय येऊ शकत नाही." (पृ. १११). प्राचीन भारतीय संस्कृतीतील यज्ञाचे स्थान विशद करताना लक्ष्मणशास्त्री यांनी म्हटले आहे, "स्वर्गातील देवतांचे या जगातील संगमस्थान वैदिक माणसाने यज्ञरूपाने निर्माण केले. सगळ्या पारलौकिक शक्ती यज्ञात संमिलित होत असत. म्हणून यज्ञसंस्था ही वैदिक संस्कृतीच्या विस्ताराचे केंद्र बनले होते. सामाजिक जीवनाची प्रक्रिया व सामाजिक संस्थांची संघटना यांचा गाभा यज्ञ होय. देवात्मभाव, प्रजामृतत्व, दीर्घायू आणि धन ही सर्व ध्येये साध्य करून घेण्याचे स्थान यज्ञसंस्था बनली होती." (पृ.१२२). "यज्ञसंस्थेतून भारतीयांची समाजव्यवस्था, राज्यशासन, कायदा, पुराणे, कला इत्यादिकांचा विकास झाला. उपनिषदांसारखे तत्त्वज्ञानदेखील याज्ञिकांच्या मननातून तयार झाले. वेद आणि यज्ञ यांच्याशी प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष ऐतिहासिक संबंध जोडता येत नाही अशी कोणतीही भारतीय संस्कृतीची शाखा नाही." (पृ. १२५). यज्ञाच्या उत्क्रान्त स्वरूपाविषयी लक्ष्मणशास्त्री यांनी म्हटले आहे, "ब्राह्मणग्रंथात यज्ञाला जादूचे स्वरूप आले आहे; परंतु उलट ऋग्वेदात यज्ञाचे मुख्य स्वरूप देवांची आराधना हे आहे. ब्राह्मणग्रंथातील यज्ञांची स्थिती ही एक प्रकारची

प्रस्तावना दिलेल्या वाचनात आल्या. त्यावरून हाती घेतलेल्या कोणत्याच विषयाकडे त्यांची संपूर्ण पाठ झालेली नाही, असे दिसून येईल. काही सूक्ष्म बारकावेदेखील वर्धमान झालेले आढळतील. पक्षीय व सांप्रदायिक मनोवृत्तीच्या वाचकांना शास्त्रीजींच्या वर्धमान चिंतनाचे स्वरूप सापडणे अशक्य होईल ! दीर्घायुष्यात विशाल, स्फूट, अनेकविध, विविध-विषयांवर एवढे संपन्न लेखन झाले आहे, की त्यात कालखंड, विविधता, अंर्तविरोध, परिवर्तन वगैरे प्रकारे बहुरंग व बहुपालट होणे, वर्धमान चिंतकाच्या बाबतीत अटळ आहे. विपरीत वाटण्याचे कारण नाही. विरोधात राहिल्यावर माणूस अल्पसंख्याक होतो. किंबहुना तो जनप्रवाहापासून दूर पडतो. अशी स्थिती पत्करूनही त्यांनी जनतेमधून मूलगामी जागृती करण्याचा प्रयत्न केला. अजूनही हा कालविभाग महत्त्वाचा वाटतो. विरोधासाठी विरोध हा त्यांचा स्वभावच नसतो.

## बहुजनांचे प्रबोधन व तर्कतीर्थ

एम्. एन्. रॉय यांच्या रॅडिकल पक्षात नव-मानवतावादी दृष्टिकोणातून कार्य करीत असताना शास्त्रीजींचा जनसंपर्क वाढू लागला. महाराष्ट्रातील बहुजनसमाजाच्या चळवळीच्या प्रवाहाकडे शहरी पांढरपेशा विद्वानांची मनोवृत्ती उदार नव्हती. ह्या कृपण मनोवृत्तीचे प्रतिनिधित्व प्रथम निबंध-मालाकारांनी केले. नागपूर–अमरावती भागात जोतीराव फुले यांच्यावर तर्कतीर्थांनी व्याख्यान दिल्याचे मी ' राष्ट्रवीर ' ( बेळगाव ) ह्या पत्रात वाचले. मग ब्राह्मोसमाजामार्फत वाईस शास्त्रीजींची तीन व्याख्याने झाली. रॉयीस्ट पक्ष विशेष लोकप्रिय नसतानाही ह्या व्याख्यानांना गर्दी झाली. विशेष विरोधात राहून धैर्याने शास्त्रीजी ह्यावेळी लोक-शिक्षणाचे कार्य करीत होते. त्यांच्या व्याख्यानांचे वाईत लाविलेले बोर्ड उलटे करून ठेविल्याचा मला अनुभव आला. एकदा शास्त्रीजींच्या रॉय पक्षातील कै. श्री. ह. रा. महाजनी यांचे म. फुले मंडईत नगरपालिकेसमोर व्याख्यान होते. त्यावेळीही व इतर अनेक सभांत काँग्रेसपक्षीयांमधील काही जणांनी धिंगाणेवजा विरोध केला. याचे कारण रॉय पक्षाने निवडणुकीत विरोधी उमेदवार उभे केले होते ! शास्त्रीबुवा एकाकी होऊनही लोकशिक्षणाचे व प्रबोधनाचेही कार्य करीत होते. निबंधमालाकार यांनी प्रामुख्याने जोतीबा फुले वगैरे समाजप्रबोधना-तील अनेक पहिल्या नेत्यांवर सडकून टीका केलेली मी अभ्यासली होती. तर्कतीर्थ ह्या सर्वांचे निरसन करू शकतील असा उत्तरोत्तर घरीदारी होणाऱ्या संपर्कातून माझा विश्वास वाढता राहिला. मी वैयक्तिक कारणासाठी शास्त्रीजींच्याकडे गेलो नव्हतो. पण वरील योगायोगाचे सार्वजनिक परिणाम दूरगामी व शुभ ठरले.

## ज्योतिनिबंध

जोतीराव यांच्या गुलामगिरी, इशारा व सार्व-जनिक सत्यधर्म या तीन पुस्तकांचा परामर्ष घेऊन सार सांगणारा हा निबंध चिकाटीच्या प्रयत्नांनी कै. श्री. शंकरराव मोरे यांच्या हस्ते वाईस प्रसिद्ध झाला. कै. श्री. केशवराव जेधे यांचीही उपस्थिती लाभली. ह्या वेळी महाराष्ट्रात काँग्रेसमधून फुटून निघून शे. का. पक्ष साकार होऊ लागला होता. ज्योतिनिबंधाने जोतीराव फुले यांच्या तेजावर जे ढग आले होते, ते साफ दूर झाले. हिंदुधर्मसमीक्षा व जोतीराव फुले ही शास्त्रीजींची कृती प्रखर पुरोगामी म्हणून त्यांच्यामागे सतत राहील. जोतीरावांवर लिहिणे-बोलणे म्हणजे पुष्कळ विद्वानांना 'अब्रह्मण्यम्' वाटे. पण हा काळ आता दृष्टिआड झाला; व जोतीरावांवर लिहीत–बोलत नाहीत असे पुरोगामी विवेकवंतही आढळत नाहीत. ज्योतिनिबंधातील उतारे कैकजणांनी आधारास घेतले व घेतात. दक्षिण हिंदुस्थानातील सुधारकांची माहिती उत्तरेच्या लोकांना फारशी नसते. ज्योतिनिबंधाचे इंग्रजीत झालेले भाषांतर त्यावेळी रॉय यांच्या मुखपत्रात प्रसिद्ध झाले होते. ज्योतिनिबंधात (इ. स. १९४७ साली ) शेवटच्या परिच्छेदात जे शेतकऱ्यांच्या भवितव्याबद्दल भाकीत केले होते, त्यानुसार भारतात शेतकरी जनतेचे राज्य अद्याप व्हावयाचे राहिले आहे, एवढेतरी हल्ली म्हणता येते. हा शिखरभूत असलेला अंतिम परिच्छेद शास्त्रीजींच्या त्यावेळच्या मनोव्यापाराचे प्रतीक होय. शास्त्रीजी सतत विद्यार्थी असतात. नवे नवे मुद्दे काढून तत्त्वाशी गाठ घालतात.

## सत्य असत्याशी मन केले ग्वाही ॥

ह्या लेखात महाराष्ट्रातील प्रबोधनाचा अर्थ सांगण्याबरोबरच तर्कतीर्थांचे समाजप्रबोधनातील

कार्यही सांगावयाचे आहे. परंपरा, प्रबोधन व परिवर्तन असा क्रम असू शकतो. समाजसुधारकाला प्रवाहाच्या उलट जावे लागते. मानियेले नाही बहुमता ।। हेच सूत्र धरावे लागते. प्रस्तावनावजा पहिल्या परिच्छेदात मी प्रबोधनाला आधार म्हणून तुकोबा अनेकांना उपयोगी पडला, असे विधान केले होते, व 'ज्योतिनिबंध' तयार झाल्यावर त्यावर तुकोबाची वरील उक्ती निवडण्यात आली. ही उक्ती जोतीबांच्याही जीवनाच्या बाबतीत तर लागू आहेच, पण शास्त्रीबुवांच्या मनाची व कार्याची त्यावेळची ठेवणही दर्शविते. बहुमताला व लोकमान्य दृष्टिकोनाला न जुमानता त्यांनी जे विचार मांडिले व कृती केली, तिलाच प्राधान्य द्यावे लागते. कारण त्यात कसोटी असते.

ज्योतिनिबंध प्रसिद्ध झाल्यावर शास्त्रीजींच्या अध्यक्षतेखाली दिल्ली येथे मराठी साहित्य संमेलन भरले. ह्या अध्यक्षीय भाषणात समाजसुधारकांच्या कार्याचा व त्यांच्या भाषाविषयक सेवेचा विशेष उल्लेख केलेला आहे. प्रबोधनावर फारच थोडचा मागील अध्यक्षांनी विचार केलेला आढळतो; हा विचार पुढे वाढता राहिला. भाषणाच्या शेवटी संयुक्त महाराष्ट्राचाही पुरस्कार केला.

"ज्योतिनिबंध" प्रसिद्ध झाल्यावर जोतीरावांच्या चरित्रावर लिहावे असा शास्त्रींचा मनोदय व्यक्त होऊ लागला. सन १९४६ ते १९५३/५४ पर्यंत शास्त्रीजींच्या मी फारच वैचारिक सहवासात वावरलो. एकूण बहुजनसमाजाचा इतिहास लिहावा अशी व्यापक कल्पना शास्त्रीजींनी मांडिली. ह्या उपक्रमाला प्रकाशनाचे स्वरूप आले नाही. तरी ह्या योजनेच्या मागील विचार-रेखा व एकूण आखणी मला वाचकांच्यासाठी सांगता येते. कारण वरील उपक्रमाला व ज्योतिनिबंधाला साधने जमवून देण्यात माझा सहभाग होता. शास्त्रीजी व मी मिळून चार पाच वर्षांच्या ह्या काळात एकूण दोनशे तास तरी एकत्र बसलो. मजकूर मी लिहून घेत होतो. बैठकीच्या अगोदर व नंतर साधक-बाधक खूप चर्चा होई. शास्त्रीजींच्या मताप्रमाणे जोतीरावांना चांगले मित्र भेटले होते. ह्या साह्यक व सहभागी मित्रांचे कार्यदेखील फुल्यांच्या कृतीतून व विचारांतून स्फूर्त होते. या दृष्टीने भालेकर-लोखंडे-विश्राम रामजी व प्रथम फुले यांच्या विचारा-आचारावर लिहून झाले. नंतर सयाजीराव व शाहूमहाराज यांच्यावरही लिहून संपले. महर्षी शिंदे यांच्यावर प्रास्तविक पान लिहून संपले. पाचपन्नासच्यावर साधने उपयोगात आणिली गेली. जोतीबांच्या 'सत्सार' अंक १ ला प्रथम शास्त्रीजींच्यामुळे प्रथमच मिळाला होता. दीनमित्राचे सं. कै. श्री. पाटील यांनीही दुर्मिळ साधने पाठविली होती. पुढे जेधे, भाऊराव पाटील वगैरेंचा परामर्श घ्यावयाचा होता. शेवटी ह्या सर्व व्यापक विषयाच्या दृष्टीने शास्त्रीबुवा स्वतःची विस्तृत प्रस्तावना लिहिणार होते. हा अभ्यास पुढे खुद्द शास्त्रीजींनाही उपयोगी झाला.

हा काळ द्विभाषिक का महाराष्ट्र ह्या चळवळींचा होता. कै. प्रल्हाद के. अत्रे ( सं. दै. मराठा) हे महाराष्ट्राची बाजू हिरीरीने मांडित होते; व त्यानी ह्या काळाच्या सुमारास "म. फुले बोलपट" तयार करण्याची कामगिरी हाती घेतली होती. ह्या कार्यासाठी त्यांना देण्यात आलेले वरील लेखन म. फुले बोलपट तयार करण्यास उपयोगी पडले. कृतज्ञतेने ज्यांचे साह्य झाले त्यांत मुख्यतः तर्कतीर्थांचे प्रथमच पडद्यावर नाव नमूद केलेले, वरील बोलपट पाहणारांना आठवत असेल. ह्या प्रमाणे वरील बौद्धिक श्रम सत्कार्यी लागले. व माझाही बराच तर्कतीर्थांच्या समवेत एकूण समाजप्रबोधनावरील अभ्यास सतत वाढता राहिला. हा लेख म्हणजे तर्कतीर्थांच्या प्रत्यक्ष सहवासाचे एक प्रतिक आहे. प्रतिबिंब आहे. स्मृती व त्यांचे कार्य यांचा समन्वय येथे केला आहे. बहुजनसमाजाच्या चळवळीवर लिहिताना एकूण सर्व प्रबोधनातील प्रवाहांचे सिंहावलोकन झाले. रॉयवादी पक्षाचे प्रवक्ते असण्याच्या काळात तर्कतीर्थांनी जी वरील कामगिरी बजाविली त्यामुळे ते पूर्वीपेक्षा बहुजनसमाजाच्या फारच जवळचे झाले. तर्कतीर्थांनी जोतीरावांच्या चरित्रातील एक एक प्रसंग चांगले उभे केले होते. जोतीरावांच्या चरित्राचे व त्यांच्या कार्याचे बीज व मूळ त्यांच्या पूर्ववृत्तात व पूर्वजांच्या हकिगतीत आहे, असे तर्कतीर्थ म्हणत असत. याची प्रचिती जोतीबांचे एक मित्र कै. श्री. नारो आवाजी महाघटशास्त्री पाटील यांनी लिहिलेले जोतीरावांचे 'अमर जीवन' ही पुस्तिका ह्यानंतर मला मिळाली. वाचताना, शास्त्रीजींच्या अनेक मुद्द्यांची आठवण

झाली. येथे शास्त्रीजींच्या साहित्याने समाजप्रबोधनाच्या क्षेत्रात जे कार्य केले म्हणजे परिणाम केला, तो मुख्यतः दर्शवावयाचा आहे.

### वैदिकधर्माचा विकास म्हणजे भारतीय धर्मविकास

तत्त्वनिष्ठ ऐतिहासिक परिवर्तनवादाचीही कक्षा तर्कतीर्थांनी ओलांडली. शास्त्रीजींचे जे प्रबोधनातील विचारविकासाचे कार्य आहे, त्याचे स्वरूप क्रांतिकारक आहे. उदा. आतापर्यंत वैदिक धर्माचा इतिहास अनेकांनी लिहिला असेल; पण भारतीय सहा दर्शनांमध्ये जी वेदप्रतिकूल दर्शने आहेत, त्यांचाही उद्‌गम व विकास वैदिक धर्माचा विकास या ग्रंथात विवेचिला आहे सांख्य, चार्वाक, जैन, बुद्ध ह्या सम्यक् दर्शनांचीही माहिती व तत्त्वज्ञान 'वैदिक धर्माचा विकास' हे पुस्तक मराठी वाचकांना पुरविते. मागील सर्व वैदिक विद्वानांनी वेदप्रतिकूल शास्त्रे केवळ खण्डणार्थ दृष्टीने हाताळली होती. शास्त्रीजींचा काळ हा अर्वाचिन काळ ठरतो; त्यांचे साधारणतः निम्मे आयुष्य पारतंत्र्यात देश असताना गेले; व स्वातंत्र्य आल्यावर पुढील जीवनौघ चालला आहे. दोन्ही काळ ते अनुभवीत आले. ज्ञान व विज्ञान ह्या दोन्हीही दृष्टीला ते महत्त्व देतात. शास्त्रीजींचे जे कार्य झाले ते त्यांच्या वर्धमान विद्वत्तेच्याद्वारे जास्ती झाले.

अलिकडील काळात राममोहन रॉयपासून ते पुढे दयानंद, रानडे-भाण्डारकर, आगरकर-फुले यांच्या अखेरपर्यंत जे प्रबोधन झाले त्याचाही उद्‌गम व विकास 'वैदिक धर्माचा विकास' या पुस्तकात आला आहे. ब्राह्मोसमाज, प्रार्थनासमाज व सत्यशोधक समाज हे वेदानुकूल नसताही त्यांच्या प्रबोधनाला व कार्याला महत्त्व दिले आहे. म. गांधी, एम्. एन्. रॉय वगैरे आधुनिक तत्त्वचिंतकही परामर्षित केले आहेत. शेवटी विज्ञानाचे विस्तृत महत्त्व सांगितले आहे. याप्रमाणे वैदिक धर्माचा विकास हा भारतीय धर्माचा विकास अशी अभूतपूर्व भूमिका घेतली आहे. भारतीय संस्कृती व धर्म यांचे एकत्व, 'परस्परसंबंध व परिणाम' सांगण्यामुळे भारताच्या नैसर्गिक व ऐतिहासिक अखंडत्वाबद्दलची समजूत वाढू शकते.

शास्त्रीजींनी हिंदुधर्माची एकदा एक व्याख्या केल्याचे पूर्ण स्मरते. हिंदुधर्म म्हणजे वैदिक, बुद्ध व जैनधर्म यांचा समन्वय होय. वाईकॉलेजला किसनवीर हे नाव देण्याचा जो समारंभ गेल्या वर्षी झाला, त्यातील भाषणात त्यांनी सांगितले, की पूर्वी भारतात एकाच कुटुंबात वैदिक, बुद्ध व जैनमताची माणसे गुण्यागोविंदाने राहत होती. वाई शहराच्या अवतीभोवती महायान पंथाच्या पालकेश्वर आदिकरून गुहा आहेत. यांचा काळ तर्कतीर्थांच्या मते इ. सनपूर्व पाचशेसहाशे वर्षे आधीचा होय. शास्त्रीजींच्यामध्ये नैसर्गिक गुणवत्ता व बुद्धिमत्ता असली तरी वाचन, चिंतन, अभ्यास व निरीक्षण ह्यामुळे दुधात साखर पडली आहे.

काही थोड्या वर्षांपूर्वी जैन धर्मियांचा वाईत एक फार मोठा महोत्सव झाला. ह्या महोत्सवात शास्त्रीजींनीदेखील भाषण दिले व जैन धर्माची आणि तीर्थंकरांची महती सांगितली. भारतीय संस्कृतीत जी निरीश्वरवादी दर्शने आहेत, ती उपेक्षणीय नाहीत. भारतीय संस्कृती मागे संमिश्रपणे समन्वयीत झालेली होती व पुढेही होणारी आहे. आता शुद्ध आर्य म्हणून कोणी राहिलेले नाहीत. अशी अनेक नि:पक्षपाती मते त्यांच्या लेखनातून व भाषणे-संवादांतून मिळू शकली. तर्कतीर्थांच्या हयातीत हे सर्व वाचकांपुढे मांडिता आले हा सुयोगच होय. हा एक त्यांच्या चरित्राचा साधन भागही ठरेल.

ज्योतिनिबंध साकारत असतानाच कै. भास्करराव जाधव (कोल्हापूर) यांनी प्रोत्साहन दिले होते. जाधवांचा व शास्त्रीबुवांचा परिचय आधीपासून होता. एकमेकांत सामाजिक-धार्मिक विषयांवर विचारविमर्श झाला होता. जाधवरावांनी रामायणावरील लिहिलेले लेख टीका-प्रतिटिकेमुळे गाजले होते. 'मराठे लोक व त्यांची भाषा' हे एक जाधवरावांचे आगळे-वेगळे व्याख्यान पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाले होते. ह्या दोन्हीही कृतींचा तर्कतीर्थांनी त्यांच्यावर लिहिताना परामर्ष घेतला होता. 'गुणिनां गुणिः वेत्ति।' या सुभाषिताचा परिचय शास्त्रीबुवांच्या ह्या लेखनावरूनही आला. पुढे कोल्हापूरला जाधवराव आजारी असताना त्यांना भेटण्याचा तर्कतीर्थांना योग प्राप्त झाला. याचवेळी कोल्हापूर येथे सत्यशोधक समाज परिषद कै. दीनमित्र पत्रकर्ते मुकुंदराव

पाटील यांच्या अध्यक्षत्वाखाली झाली. या परिषदेचे उद्घाटन शास्त्रीजींनी केले व सत्यशोधक समाजाचे समाजप्रबोधनाच्या इतिहासातील कार्यही तर्कतीर्थांनी निवेदिले. ह्याप्रमाणे बहुजनांचा संबंध वाढत गेला. फलटण ( जि. सातारा ) येथील म. फुले पुतळ्याचे उद्घाटनही पुढे त्यांच्या हस्ते झाले.

सन १९१९ ते २९ पर्यंत वाईमध्ये झालेली व सातारा वगैरे मुंबई इलाख्यामध्ये झालेली सत्यशोधक चळवळ शास्त्रीजींना पूर्ण अवगत होती. जेधे-जवळकर, बाबूराव यादव वगैरे पुढाऱ्यांची वाईत झालेली व्याख्यानेही त्यांना ऐकून ठाऊक होती. पण ही चळवळ क्रियाप्रतिक्रियात्मक घुमस्चक्रीतून त्यावेळी चालली होती; विरोधही पुष्कळ होता. या चळवळीचा सांगोपांग अभ्यास करून नंतर शास्त्रीबुवांनी त्यांना अभिप्रेत अशी समीक्षा मांडली आहे. मालसे-कीर संपादित ' समग्र फुले वाङ्मय ' पुस्तकाला त्यांनी लिहिलेल्या विस्तृत प्रस्तावनेत ही समीक्षा सापडते. ज्योतिनिबंधाच्या वेळी ( १९४७ सालात ) ' समग्र फुले ' उपलब्ध नव्हते.

शास्त्रीजींची पहिली ३० वर्षे व १९८१ च्या अगोदरची ३० वर्षे सोडून मधला जो सुमारे पंचवीस वर्षांचा कालखंड होता, तो त्यांच्या विचारप्रखरतेचा ठरतो. यावेळी ते काँग्रेसच्या विरोधात होते. ' नवमानवतावाद ' हे त्यांचे पुस्तक ह्याच कालखण्डातील आहे. ' निरीश्वरवाद ' हेही पुस्तक हिंदुधर्मसमीक्षेप्रमाणेच अपूर्व आहे. ह्या काळात पाखण्डी म्हणूनच विशेष प्रसिद्धीस चढले होते. जातिवर्णसत्ता-मत्ता तर राहिली पाहिजे, व देशाला ( स्वराज्य ) राजकीय स्वातंत्र्यही मिळाले पाहिजे असे गर्भित धरून राजकारण करणारा पूर्वी एक जाणता वर्ग असे. बहुजनसमाजाला सत्तेत योग्य वाटा दिला पाहिजे, त्यांच्यातून जे नेतृत्व पुढे येत आहे ते स्वागतार्ह आहे अशा विचारसरणीचे शास्त्रीजी होते. ह्यामुळेच त्यांच्या हातून बहुजनसमाजवादी वाङ्मयाची भर घालून आस्थापूर्वक सेवा झाली.

म. फुले यांच्यावरील चिंतन व प्रेम पुढेही उत्तर कालखंडातही कायम राहिले. उदा. साहित्य संस्कृती मंडळाचे अध्यक्ष असतानाच मण्डळाचे अनुदानातून ' म. फुले : समग्र वाङमय ' प्रसिद्ध झाले. म. फुले यांची पुस्तके चांगली छापून काढावीत असे त्यांचे मत ज्योतिनिबंधाच्या ( इ. स. १९४७ ) काळातही होते. 'समग्र फुले वाङ्मया'च्या प्रस्तावनेत त्यांनीच फुल्यांना प्रथमच ' नरव्याघ्र ' म्हटले आहे. एकूण म. फुले यांचे विचार वस्तुस्थितीस धरून होते असे शेवटी निष्कर्ष म्हणून सांगितले आहे.

तर्कतीर्थ सत्यशोधक समाज, ब्राह्मो व प्रार्थना समाजाचे प्रत्यक्ष सभासद कधीच नव्हते. तरी आस्थापूर्वक समाजप्रबोधनातील ह्या प्रवाहांचा त्यांनी जो समक्ष पाठपुरावा केला, तो नजरेआड करिता येत नाही. कृतज्ञतेने पावती देणे हे एक सार्वजनिक कार्य होय. बहुजनसमाजाच्या प्रवाहाची सक्रीय सेवा करणारे पूर्वी राजारामशास्त्री भागवत होऊन गेले. लक्ष्मणशास्त्र्यांचा दुसरा क्रमांक त्याहीपेक्षा व्यापक व समतोल ठरतो. तर्कतीर्थ प्रबोधनाचे समीक्षकही ठरतात. उदा." सत्यशोधक चळवळ म्हणजे ब्राह्मणेतर चळवळ असे संकुचित रूप गृहीत धरले तर यापुढे या चळवळीला यत्किंचितही भवितव्य नाही, हे निश्चित समजावे. अशा संकुचित रूपामुळेच त्या चळवळीची गेल्या ५० वर्षांत पिछेहाट झाली; तिला विकृत जातिवादाचे रूप आले;" [ म. फुलेकृत सार्वजनिक सत्यधर्म-पुस्तकसार ह्या पुस्तकातील तर्कतीर्थांची प्रस्तावना पहा. ]

## कार्याचा परिघ व वैचारिक व्यास

पूर्व व पश्चिम जग आणि सारा भारत शास्त्रीजींनी पाहिला. साहाजिकच शास्त्रीजींच्या कार्याचा परिघ व विचारप्रधान वाङ्मयाचे क्षेत्र एवढे मोठे आहे की त्या सर्वाचा मागोवा घेणे हे अतिव्याप्त कार्य आहे. अनेक वेळा धक्के देणारे विचार व कार्ये त्यांच्यात आढळते. त्यांनी कधी स्वतःला अप्रमादशील मानिले नाही. लोकशाहीला विभूतीपूजा धोकादायक आहे, असे जयप्रकाश यांच्यावर बोलताना त्यांनी सांगितले. लो. टिळक वेदोक्त प्रकरणी चुकले असे शाहूमहाराजांवर लिहिताना त्यांनी स्वच्छ सांगितले आहे. शास्त्रीजी कोणाच्याही मतस्वातंत्र्याच्या व हितसंबंधाच्या आड येत नाहीत. प्रतिपक्षाचे स्वातंत्र्य मानतात. मोठमोठ्या सभा व परिसंवादात्मक उपक्रम यांचे अध्यक्ष या नात्याने त्यांनी उत्कृष्ट संचालन केले व करीत असतात. शम-दम अंगी असल्यामुळे






विरोध व शत्रुत्व वाढवू देत नाहीत. वाद वाढवू देत नाहीत. साहित्य संस्कृती मंडळाचे अध्यक्षस्थान त्यांच्याकडे असताना सत्तेचे व त्यांचे नाते जमले. 'समाज प्रबोधन पत्रिका', 'अस्मितादर्श', 'संशोधन पत्रिका', डॉ. बाबा आढाव व अनिल अवचट यांचे 'पुरोगामी सत्यशोधक' वगैरे समाजप्रबोधक नियतकालिकांना त्यांनी अनुदाने चालू केली. ग्रामीण साहित्य व दलित साहित्य यांनाही प्रोत्साहन दिले. त्यांच्या सर्वस्पर्शी सामाजिकतेचा व प्रबोधनासंबंधीचा जिव्हाळाच व्यक्त झाला. हा सर्व कालखंड रचनात्मक व विधायक झाला. सत्तेचा वापर चांगला करून त्यांनी समाजप्रबोधनाच्या कार्यात भरच घातली. सा. संस्कृती मंडळातर्फे व अनुदानातून उत्कृष्ट वाङ्मय निर्माण झाले आहे. हे वाङ्मय मागील प्रबोधनातील प्रेरक विचारसंपदा रक्षण करू शकेल. विश्वकोशातील शास्त्रीजींच्या टिपणी (Notes) देखील प्रबोधक आहेत. उदा. दयानंद सरस्वती यांच्यावरील टिपणी आर्यसमाज व दयानंदांचे कार्य चांगले सांगते. पुणेरी मेंटॅलिटीचा कोणी वरील मण्डळावर अध्यक्ष असता तर वरील सर्व झालेले कार्य एवढ्या पुरोगामित्वाच्या कसोटीस उतरले नसते. पश्चिम महाराष्ट्राखेरीज मराठवाडा-नागपूर-विदर्भ वगैरेमधील साहित्य सेवकांनाही अनुदाने देण्यात आली. गुणाधिक्य, कार्याधिक्य व ह्यांचे परिणामाधिक्य तपासूनच त्यांच्या कार्याचे मूल्यमापन होऊ शकते; छिद्रान्वेशक दृष्टीला चांगले दिसत नाही. माझ्या व त्यांच्या दरम्यान पक्षभेद झाले नाहीत असे नव्हे. थोडेफार झालेच. मतभेद होऊ शकतात. पण ते कितपत ताणावयाचे हे शास्त्रीजींपासून शिकता येते. त्यांच्या जीवनातील महत्त्वाच्या स्मृती मी लक्षात ठेविल्या आहेत. उदा. पूर्वी पुण्यास एक पशुबळी देणारा यज्ञ झाला. हल्लीच्या काळात यज्ञात पशू बळी देणे, शास्त्रीजींना अर्थात अमान्य होते. यज्ञाला त्यांचा पाठिंबा नव्हता. वाईचे कै. गो. भ. चौण्डेमहाराज यांच्या मते वेदात पशुबळीला आधार नाही; पण असे आधार वेदात आहेत असे त्यांनी चौण्डेमहाराजांना सांगितले, हे स्मरते. पशुबळी यज्ञामुळे महाराष्ट्रात वादळ माजले होते!

तर्कतीर्थांनी चाळीस-पन्नास वर्षांत केलेल्या प्राज्ञपाठशाळेच्या आजच्या क्रांतिकारक प्रगतीविषयी त्यावेळच्या सहकाऱ्यांना व पंचक्रोशीतील मण्डळींना त्यांच्या महत्त्वाकांक्षेची कल्पना नव्हती. पण एकूण समाजास बहिःशालपद्धतीने त्यांनी केलेले शिक्षणदान व उपलब्ध केलेली ज्ञानसाधने ही पाहाता हा एक मोठा ज्ञानसागरच विकासला आहे. हे एक बहिःशाल विद्यापीठच उभे राहिले आहे.

महाराष्ट्रातील प्रबोधनाची चळवळ व त्यातील तर्कतीर्थांचे कार्य निवेदिताना तर्कतीर्थ ही असामान्य व्यक्ती समजावून घ्यावी लागते. यामुळे त्यांच्या यशाचे इंगित समजू शकते. तर्कतीर्थ स्थितप्रज्ञ आहेत. द्रष्टे आहेत. वर्तमानाचा व पुढचाही मागोवा ते घेतात. लक्ष्मणशास्त्री ह्यांना व्यापक कार्य करीता आले याचे कारण त्यांचा नेमस्त स्वभाव होय. पूर्वग्रहदूषितपणाने ते कोणत्याही विषयाकडे पाहात नाहीत. अतिप्राचीन वैदिक काळातच ते रममाण होत नाहीत. पंढरपूरच्या यज्ञाच्या विरोधाला त्यांनी पाठिंबा दिला होता. त्यांची कित्येक राजकीय भाकीते खरी ठरली. उदा. चीनची स्वारी येण्याच्या पाचसहा वर्षे आधी त्यांनी चीनचा धोका बोलून दाखविला होता. ह्यावेळी केवलानंद सरस्वती मंदिराच्या पायाचे काम चालू होते.

## प्रबोधनानुसार कार्य

बहुजनसमाजाच्या बाजूचे राजकारण म्हणजे बहुसंख्य जनतेच्या बाजूचे राजकारण असा एक अर्थ महाराष्ट्रात होता व आहे. तथापि राजकारण म्हणजे समाजाचा, देशाचा प्रपंच होय. राजकारण केल्याने होत असते. स्वातंत्र्य आल्यावर निवडणुकीतील एक पक्ष ह्या नात्याने रॅडिकल पक्ष बरखास्त झाला; व शास्त्रीजी विरोधापेक्षा विधायक व रचनात्मक कार्याकडे वळले. इंग्रज जाणार, तो राहाणार नाही असे सन १९४७ पूर्वीही शास्त्रीजी सांगीत असत. प्रत्यक्ष तो गेल्यावर शास्त्रीजींनी माननीय यशवंतराव चव्हाण-किसनवीर यांच्या बाजूचे राजकारण केले. ह्यावेळी महाराष्ट्राला स्थिर सरकार प्राप्त झाले होते. प्राज्ञपाठशाळा– धर्मकोश व विश्वकोश ही पूर्वीची व शेवटची नवी दोन कार्ये शास्त्रीजींनी वर्धमान ठेविली. प्रबोधनाच्या दृष्टीने ही सर्व कार्ये महत्त्वाची आहेत. शास्त्रीजी प्रा. पा. मंडळाचे प्रमुख होण्यापूर्वी कार्यकारी मंडळावर

अब्राह्मण समाजापैकी कोणी नव्हते. श्री. कै. किसन वीर ह्यांचा तर्कतीर्थांनी समावेश केला. श्रीमान् यशवंतराव चव्हाण हे म. गांधी व काँग्रेसच्या राजकीय–सामाजिक प्रबोधनातून पुढे आलेले अ. भा. नेते झाले. तरी "म. फुले व शाहू" यांच्या प्रबोधनाचे व विद्याप्रसाराचे महत्त्व यशवंतराव कृतज्ञतेने सांगितात. "शाहूमहाराज झाले नसते तर म. फुले यांचे नाव निबंधमालेतच वाचावयास मिळाले असते." असे तर्कतीर्थांच्या बरोबर बोलत असताना त्यांनी म्हटले. शाहूमहाराजांना पुण्यास एम्. एस्. एम्. आरच्या प्लॅटफॉर्मवर समक्ष पाहिल्याचेही सांगितले. बहुजनसमाजाच्या बाजूने तर्कतीर्थांनी केवळ लिहिले-बोलले असेच नव्हे, तर एकपरी मूळचा फुले–शाहू पक्ष काँग्रेसमध्ये यशवंतरावजींच्या नेतृत्वाखाली कार्य करीत असताना शास्त्रीजींनी वेळोवेळा मार्गदर्शन करून बहुजनसमाजाच्या राजकारणाला बौद्धिक व सक्रीय पाठिंबा दिला. हल्ली राजकारणाचे स्वरूप पालटले आहे.

वाई व वाई तालुका, महाराष्ट्र व एकूण भारतात साहित्य संस्कृती मंडळाचे अध्यक्ष व विश्वकोशाचे प्रमुख संपादक ह्या नात्याने तर्कतीर्थांचे तीस-बत्तीस वर्षे जे कार्य झाले तें, व विश्वकोश आणि धर्मकोश यांच्या द्वारे चालू असलेले कार्य हे सर्व प्रबोधनात्मक आहे. म्हणजे पुरोगामी आहे. शास्त्रीबुवांनी प्राः पा. शाळेला आधुनिक काळानुसार परिवर्तित केले. शाळेचा प्राज्ञप्रेस काढून स्वावलंबनाने अनेक ग्रंथ व पुस्तके प्रकाशित केली. '**नवभारत**' चालवावयास घेऊन ते समाजप्रबोधनार्थ चालविले. त्याचे ध्येयधोरण एकपक्षीय, एककल्ली, विशिष्ट सांप्रदायी किंवा केवळ प्रचारकीय ठेविले नाही. चर्चेला, चिकित्सकतेला व संशोधनाला वाव दिला जातो. शास्त्रीजी स्वपक्षाचा बिनहिशेबी अहंकार किंवा अभिनिवेश धरीत नाहीत, हे नवभारताच्या वाचकांना, लेखकांना व अन्य सर्व संबंधितांना अनुभविण्यास मिळाले असेलच. राजकारणात वर्तमानकाळानुसार पत्कराव्या लागलेल्या स्वपक्षाची ते समीक्षा-मीमांसा करीतात. त्रुटी व वैगुण्ये सांगतात. त्यांच्यात सांप्रदायिकता जशी नाही, तसेच पक्षीयता-देखील सापडली नाही. आणीबाणीला विरोध दर्शवून त्यांनी लोकशाहीची बाजू घेतली. निधर्मीवादाचे समर्थन करण्यात त्यांनी त्यांची बुद्धिमत्ता खर्ची घातली. लोकशाही व निधर्मीवाद ह्या गेल्या शतकात होऊन गेलेल्या प्रबोधनाचा स्वातंत्र्यातील परिपाक आहे. ह्या झालेल्या प्रबोधनात्मक एकूण कार्यावरूनही त्यांच्या कार्याचे व्यापक स्वरूप कळेल. वरील ह्याही काळात अस्पृश्यतानिवारण वगैरे प्रबोधनातील मुद्द्यांच्याकडे त्यांनी दुर्लक्ष केले नाही. उत्तर हिंदुस्थानातील पुरीच्या शंकराचार्यांनी काही वर्षांमागे जातिवर्णधर्माला प्राधान्य देवून दलितादी समाजांना न रुचणारे, न परवडणारे भाषण केले. वाईच्या वसंत व्याख्यानमालेतील त्यावेळच्या भाषणात तर्कतीर्थांनी शंकराचार्यांचे मुद्दे खोडले व पुरुष-सूक्तदेखील प्रक्षिप्त असल्याचे सांगितले. वर्तमान प्रश्नावर प्रतिवर्षी व्याख्यान देवून ह्या साठ वर्षांपेक्षा जास्ती वर्षे सतत चाललेल्या वाई व. व्या. मालेतूनही शास्त्रीजींनी समाजप्रबोधन केले. वरील व्याख्यान गाजले होते. पुढे संबंधित शंकराचार्यांवर केंद्र सरकारने खटलाही भरला होता. वाईत मुलांचे एकमेव हायस्कूल होते. सन १९५६ साली महर्षि शिंदे हायस्कूल सर्वसामान्य ग्रामीण विद्यार्थ्यांसाठी काढण्यात आले. त्याच्या उद्‌घाटनप्रसंगी माननीय यशवंतरावांसमवेत शास्त्रीजी उपस्थित होते व नव्या इमारतीचे पायापूजन तर्कतीर्थांनी केले. प्राज्ञपाठशाळेतर्फे एकलव्य विद्यार्थी वसतिगृह अनेक वर्षे हरिजन विद्यार्थ्यांसाठी प्रा. पा. शाळेच्या मालकीच्या द्रविड वाड्यात चालविले. संस्था चालविणे हे सर्वात अवघडांतील अवघड काम होय, असे एक वाक्य त्यांचे म्हणून पूर्ण आठवते. या दृष्टीने प्राज्ञपाठशाळेचे धुरिणत्व त्यांनी दीर्घ वर्षे सतत केले आहे. त्यांच्या कारकीर्दीत प्रतिवर्षी होणाऱ्या सरस्वती उत्सवात आधुनिक काळाच्या दृष्टीने वर्तमान विषयांवर विद्वानांची व्याख्याने ठेवून त्यांनी श्रोत्यांना ज्ञानदान केले आहे. इंदिरा गांधी, राधाकृष्णन्, राजेंद्रप्रसाद वगैरे थोर थोर पुरुषांना वाईस बोलावून त्यांच्या दर्शनाचाही लाभ शास्त्रीजींनी लोकांना घडविला. महाराष्ट्रातील प्रबोधनात शिक्षणप्रसार व त्यातल्या त्यात ग्रामीण बहुजनसमाजात शिक्षणाचा प्रसार विशेषतः वाढविणे हा मोठा मुद्दा होता. वाईस कॉलेज काढण्यात व ते,

त्याच्या बालपणी चालविण्यात शास्त्रीजींचे श्रम व नेतृत्व महत्त्वाचे मानले पाहिजे,

### शेवटी

महाराष्ट्रातील प्रबोधनाचा विद्यमान विचार केल्यानंतर असे जाणवते की, रानडे-भाण्डारकर यांना अभिप्रेत असणारे प्रबोधन प्रगत होऊन ते जनतेपर्यंत पोहोचले नाही. "फुले-आंबेडकर" यांच्यावर जास्ती विचारप्रपंच चालू असतो. महाराष्ट्रातील मार्क्सवादी व समाजवादी शहरांतूनच राहिले आहेत. स्वातंत्र्य आल्यामुळे लो. टिळकांची ध्येयपूर्ती झाली आहे. आगरकरांच्या बुद्धिवादाला खतपाणी घालणारे तर्कतीर्थांसारखे थोडेच दिसतात. स्वातंत्र्य आल्यावर प्रबोधन वर्धमान न होता एकपरी पुच्छप्रगती चालल्याचीही दिसते ! तर्कतीर्थांच्या 'सार्वजनिक सत्यधर्मसार' (१९७३) ह्या माझ्या पुस्तकाच्या प्रस्तावनेतील पुढील काही भाग सादर करून वाचकांची रजा घेत आहे.

"बहुजनसमाज हा उच्चनीच जातिभेदाच्या अहंकाराने फुटीर, विस्कळीत व दुर्बळ झाला आहे; अंधश्रद्धेच्या अंधारात चाचपडत आहे; लोकभ्रमाची पिशाच्चे व भुते अजून बहुजनसमाजाच्या मानगुटी पकडून बसली आहेत; त्याच्यात विचारक्रांती झाल्याशिवाय नवजीवनाच्या प्रेरणा प्राप्त होणार नाहीत. त्याचे एकजीव सामर्थ्यशाली समाजात रूपांतर होण्याची गरज आहे."

"सर्व मानवजातीचा धर्म एकच आहे; प्रस्थापित हिंदू, मुसलमान, ख्रिश्चन इत्यादी धर्मसंस्था मानवामानवांत फूट पाडतात; त्यामुळे मानवी प्रगती खुंटते."

---










म. अ. मेहेन्दळे

# मन्त्रब्राह्मणोपनिषद्

तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी संपादिलेल्या धर्मकोशाच्या पहिल्या खंडाचे उपनिषत्काण्ड असे नाव असून त्या खंडाच्या पहिल्या भागाला त्यांनी ' मन्त्रब्राह्मणोपनिषद् ' असे स्वरचित नाव दिले आहे.[1]

भारतीय वाङ्मयाच्या आरंभीच्या काळी वेदवाङ्मयाची रचना झाली. ह्या मोठ्या कालखंडाच्या सुरुवातीस मंत्र-ब्राह्मणे व शेवटी उपनिषदे यांची रचना झाली. ह्या सुमारे हजार–दीडहजार वर्षांच्या कालावधीत भारतात जे वैचारिक मंथन झाले त्याचे अखेरचे निष्कर्ष उपनिषदांत ( वेदांतांत ) आढळतात. ह्या एकंदर विचारमंथनात आरंभापासून अखेरपर्यंत एखादे अविच्छिन्न सूत्र आपणास आढळते, की वेदांतातील विचार हे आरंभीच्या विचारांपासून तडकून निराळे उभे आहेत, म्हणजेच ही एक क्रमाने घडून आलेली वैचारिक उत्क्रांती आहे की ती एक क्रांती आहे, असा एक विचारकरण्यासारखा प्रश्न आहे.

वेदांचा मन्त्रब्राह्मणात्मक भाग व उपनिषदे यांत जो विचारांच्या दृष्टीने फार मोठा फरक आढळून येतो तो काही प्रातिनिधिक स्वरूपाच्या वाक्यांनी किंवा कल्पनांनी असा सांगता येईल : वेदांपासून वेदांतापर्यंतच्या ह्या दीर्घ प्रवासाची सुरुवात ' यज्ञेन यज्ञमयजन्त देवास्तानि धर्माणि प्रथमान्यासन् ' ( ऋ. १.१६४.५० ) ह्या घोषणेपासून झाली, पण त्याचा अंत ' प्लवा ह्येते अदृढा यज्ञरूपाः ' ( मुण्डक उप° १.२.७ ) ह्या घोषणेने झाला. पहिल्या घोषणेत यज्ञांचे प्राचीनत्व, प्रमाणत्व आणि धर्मत्व ठासून सांगण्यात आले; तर दुसऱ्या घोषणेत त्याच यज्ञांची ' ज्यांच्यावर विसंबून राहता येत नाही अशा नावा ' असे म्हणून बोळवण करण्यात आली. वेदांच्या सुरुवातीस ' अग्निमीळे पुरोहितं यज्ञस्य देवमृत्विजम् । होतारं रत्नधातमम् ' ( ऋ. १.१.१ ) असे म्हणून रत्ने वारंवार देणाऱ्या अग्नीचे यज्ञासाठी आवाहन केले गेले, तर रत्नांनी माणसाला अमृतत्व मिळविण्याची मुळीच आशा नाही ( ' अमृतत्वस्य तु नाऽऽशाऽस्ति वित्तेन ' बृह° उप° २.४.२ ) असे मैत्रेयीला सांगून याज्ञवल्क्याने रत्नांची तुच्छता स्पष्ट केली. ऋग्वेदात सर्वसामर्थ्यशाली तत्त्व ' ऋत ' मानले गेले होते. म्हणून ' ऋतेन विश्वं भुवनं विराजथः ' ( ऋ. ५.६३.७ ) असे आदित्यांना उद्देशून म्हटले जाऊ शकत होते, तर ऋताची जागा उपनिषत्काळी ' आत्मन्-ब्रह्मन 'ने घेतल्यामुळे 'आत्मा वा अरे द्रष्टव्यः श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्यः ' ( बृह° उप° २.४.५ ) असा एक ठाम निष्कर्ष उपनिषदांत आचार्यांनी शिष्यांना सांगितला.

वेदकाळाचा आरंभ व शेवट ह्यांत मानवाच्या इतिकर्तव्यतेच्या दृष्टीने असा फार मोठा फरक असल्यामुळे ते दोन खंड एकमेकांशी फटकून आहेत, असे काही विद्वानांना वाटते.[2] तर त्या दोन खंडांत

---

१. ' मंत्रब्राह्मण ' नावाचा एक ग्रंथ उपलब्ध आहे. सकृद्दर्शनी ' मन्त्रब्राह्मणोपनिषद् ' हे त्या ब्राह्मणग्रंथाशी संबंधित उपनिषद् असावे, अशी कल्पना होते. परंतु ते तसे नाही.

२. " The attitude of mind characteristic of our historians of Indian philosophy arises from an idea that the highest philosophic thought in the Upanisads was not a gradual development, but was a result of a spontaneous, miraculour and revolutionary inspiration; that it was a phenomenon which had burst itself loose from all old traditions." ( Preface p. 9 ).

अनुक्रमणिका








वैचारिक अंतर असूनही त्यांना सांधणारी एक अखंड साखळी आहे असे इतरांना वाटते. शास्त्रीबुवा ह्या दुसऱ्या पक्षाचे आहेत[1] आणि त्यांचे हे मत का बनले आहे, ते सांगण्यासाठी 'मन्त्रब्राह्मणोपनिषद्' नावाचा हा ग्रंथ त्यांनी दीर्घ परिश्रम करून संपादिला आहे.

ह्या ग्रंथाचे दोन भाग आहेत. पहिला भाग एका दीर्घ प्रस्तावनेच्या स्वरूपाचा आहे. ही प्रस्तावना शास्त्रीबुवांनी प्रथम मराठीत लिहिली, आणि नंतर डॉ. वा. गो. परांजपे यांच्या साहाय्याने त्यांनी तिचे इंग्रजीत भाषांतर केले. प्रस्तुत ग्रंथात हे इंग्रजी भाषांतर छापण्यात आले आहे. मूळ मराठी प्रस्तावना केव्हाच प्रसिद्ध झाली नसल्यास 'नवभारता'त आजही प्रसिद्ध व्हावी, अशी तिची योग्यता आहे. वेदांचा जो उपनिषत्पूर्व भाग आहे, त्यात शास्त्रीबुवांच्या दृष्टीने जिथे उपनिषदांतील विचारांशी जुळतील अथवा त्या विचारांचे बीजभूत ठरतील अशी वचने आढळतात, त्या साऱ्या आम्नायवचनांचे संकलन त्यांनी ग्रंथाच्या दुसऱ्या भागात केले आहे.

INTRODUCTION (इंग्रजी पृ. ११–१०५)
प्रस्तावना ( संस्कृत पृ. १०६–१५३ )

शास्त्रीबुवांनी ही प्रस्तावना फार विचार करून लिहिली आहे. तीत शास्त्रीबुवांची बहुश्रुतता आणि दीर्घकालीन चिंतन ह्यांचा प्रत्यय जागोजागी येतो. औपनिषद तत्त्वज्ञानात पुरुष, प्राण, व आत्मन्–ब्रह्मन् अशा तीन संकल्पना आढळतात. प्रस्तुत प्रस्तावनेत शास्त्रीबुवांनी ह्या संकल्पनांच्या आविष्काराचा आरंभापासून शेवटापर्यंत मागोवा घेतला आहे. शास्त्रीबुवांच्या ह्या साऱ्या विचारांचा सारांश इथे सांगण्याचा हेतू नाही. त्यांतल्या काही महत्त्वाच्या मुद्द्यांकडे अथवा जिथे मतभेदास थोडा वाव आहे, अशा ठिकाणांकडे वाचकांचे लक्ष वेधायचे आहे.

( १ ) पुरुष

तैत्तिरीय–उपनिषदातील ब्रह्मानंदवल्लीच्या पहिल्या अनुवाकात आत्म्यापासून आकाश, आकाशापासून वायू, वायूपासून अग्नी अशी क्रमाक्रमाने उत्पत्ती सांगितल्यावर अखेरीस अन्नापासून पुरुषाची उत्पत्ती झाली असल्याचे म्हटले आहे. हा पुरुष अन्नरसमय असल्याचे तिथे सांगितले आहे. पुढे दुसऱ्या अनुवाकात ह्या अन्नरसमय पुरुषाहून निराळा एक प्राणमय अंतरात्मा असून तो पुरुषाकार आहे, असे वर्णिले आहे.

ऋग्वेदातील यज्ञप्रधान संस्कृतीचा केन्द्रबिन्दू अर्थातच अग्नी. त्या अग्निदेवतेपासून सुरुवात करून तिची परिणती उपनिषदांत वरील पुरुषात कशी झाली, त्या इतिहासाचे सुरेख विवेचन शास्त्रीबुवांनी प्रस्तावनेच्या प्रारंभी केले आहे. ते सर्वच्या सर्व मुळातूनच वाचायला हवे. यज्ञीय अग्नीला एक प्रकारची व्यापकता प्रथमपासूनच होती, हे त्याच्या 'जातवेदस्' म्हणजे 'झालेले (सर्व) जाणणारा (जातानि वेद)'[2] ह्या नावावरूनच लक्षात येते. त्यामुळे ह्या अग्नीचा 'वैश्वानर अग्नि' म्हणजे साऱ्या नरांना अथवा पुरुषांना व्यापणारा अग्नी होण्यास अडचण आली नाही. पुढे शतपथब्राह्मणात (काण्ड १०) अग्निचयनाच्या निमित्ताने अग्नीला पक्षिरूप (वयोविध) कल्पिण्यात आले आणि उपनिषदातील पुरुषविध आत्म्याचे वर्णन तो पक्षी असल्यासारखे करून ही अग्नि–पुरुष–साखळी पूर्ण करण्यात आली.[3]

ऋग्वेदात अग्नी, इन्द्र इत्यादी देवतांची स्तुती करताना प्रत्येक देव सर्वश्रेष्ठ असल्यासारखी वर्णने आढळतात. ह्या प्रत्येकी सर्वश्रेष्ठत्वाच्या कल्पनेतून पुढे सर्व देवतांच्या मुळाशी एकच सर्वश्रेष्ठ देव, अथवा विश्वव्यापक तत्त्व, असल्याची कल्पना उदयास आली. ह्या तत्त्वाला 'पुरुष' असे संबोधून '-पुरुषान्न परं किंचित् सा काष्ठा सा परा गतिः'

१. "The chief object of Part I is to show the historical background and the tradition of the Upaniṣadic philosophy. It is in the pre-Upaniṣadic Vedic literature that we must study the process of evolution of the basic and the highest philosophical thoughts incorporated in the Upaniṣadic philosophy." ( Preface p. 6. )

२. निरुक्त ७.१९. यास्काने 'जातवेदस्'च्या दुसऱ्याही व्युत्पत्त्या दिल्या आहेत.

३. Introduction पृ. १९.

(कठ उप. ३.११) असे त्याचे वर्णन केले गेले. ह्या वैचारिक उत्क्रान्तीला ऋग्वेदकालीन नारायण ऋषीचा फार मोठा हातभार लागला असल्याचे शास्त्रीबुवांनी स्पष्ट केले आहे.[१] त्याने रचलेल्या पुरुषसूक्तात (ऋ. १०.९०) 'यद्भूतं यच्च भव्यम्' (१०.९०.२) ते सारे हा 'पुरुष'च असल्याची एक विराट कल्पना त्याने केली आहे, आणि त्या पुरुषाच्या निरनिराळ्या अवयवांच्या आहुत्या एका काल्पनिक यज्ञात दिल्याने विश्वाची उत्पत्ती झाली, असे एक भव्य स्वप्न त्या ऋषीने पाहिले आहे.

मन्त्र-ब्राह्मणे व उपनिषदे यांत आढळणाऱ्या 'पुरुष' संकल्पनेमागचे रहस्य उलगडून सांगताना शास्त्रीबुवा म्हणतात : "... if the Vedas have decided to style the all-comprehending principle underlying the universe as Puruṣa, it was not in the primary sense of that word. The Vedas use it only in a metaphorical way; the real meaning indicated is the basic unity underlying the universe in all time and in all space. The word puruṣa does not denote the human form; it has been chosen as the vehicle of the concept of an ultimate truth, the primary sense of 'Human form' being only a means of conveying by suggestion a highly subtle idea."[२]

शास्त्रीबुवांनी 'पुरुष' विषयक संकल्पनेच्या उत्क्रांतीचे केलेले विवेचन एकंदरीने मान्य होण्यासारखे असले तरी '(In the Vedas) the word puruṣa does not denote the human form' ह्या त्यांच्या म्हणण्यापुरता मतभेदाला अवसर आहे. ऋग्वेदातील पुरुषसूक्तात आढळणारी पुरुषाच्या अवयवांची कल्पना आणि तैत्तिरीयोपनिषदातील 'स वा एष पुरुषविध एव। तस्य पुरुषविधतामन्वयं पुरुषविधः' (२.२) ह्या सारखे वचन ह्यांवरून पुरुष शब्दाने साऱ्या विश्वाच्या मुळाशी असलेले एकत्व ही कल्पना व्यक्त होत असली, तरी त्या संकल्पनेच्या प्रक्रियावस्थेत आणि पूर्णावस्थेत ऋषिमुनींच्या डोळ्यांसमोरून त्या शब्दाच्या वाच्यार्थाने प्रतीत होणारे पुरुषविधत्व हलले नव्हते हे स्पष्टपणे जाणवते.

शास्त्रीबुवा म्हणतात की, पुरुष शब्दाची 'पुरि शेते' ही जी व्युत्पत्ती वैदिक वाङ्मयात आढळते तिनेही त्यांचा वरील मुद्दा सिद्ध होतो. ह्या व्युत्पत्तीचा अर्थ असा आहे की, पुरुष म्हणजे डोळ्यांना दिसणारे नश्वर शरीर नसून डोळ्यांना न दिसणारे पण शरीरात (पुरि) वास करणारे (शेते) अविनाशी तत्त्व. बृहदारण्यकात द्विपाद शरीराच्या जोडीला चतुष्पाद शरीराचीही गणना करून 'पुरि'ची व्याप्ती वाढवली आहे.[३] शास्त्रीबुवांचा हा मुद्दा– पुरुष म्हणजे सर्वांच्या अंतर्यामी असलेले अविनाशी तत्त्व– हा त्या शब्दास दिला गेलेला तत्त्वज्ञानविषयक अर्थ सिद्ध करण्यास समर्पक असला तरी त्यामुळे वेदांत पुरुष शब्दाने त्याचा वाच्यार्थ अजिबात अभिप्रेत नाही, हे सिद्ध होण्यासारखे नाही.

पुरुष शब्दाची 'पुरि शेते' ही प्राचीन व्युत्पत्ती सांगताना शास्त्रीबुवांनी तिचा पहिला म्हणून जो संदर्भ दिला आहे, तो बरोबर नाही. त्यांनी नमूद केलेला अथर्ववेद १०. २. ३० हा मंत्र 'पुरं यो ब्रह्मणो वेद यस्याः पुरुष उच्यते' असा आहे. ह्या व्युत्पत्तीत 'शेते' चा उल्लेख नाही. खेरीज ह्या मंत्राने देहात वास करणारे तत्त्व ते पुरुष असा बोध होत नसून मानवी शरीराला जो ब्रह्मन्चे 'पुर्' म्हणून ओळखतो तो पुरुष असा मंत्रार्थ आहे. म्हणजे ह्या मंत्रात पुरुष शब्दाचा 'ब्रह्मन्'ऐवजी 'तत्त्ववेत्ता' (पुरुष) असा अर्थ अभिप्रेत आहे. अर्थात हे खरे की, शरीराला ब्रह्माचे 'पुर्' म्हणून ओळखले की त्यात ब्रह्मन्चा वास असतो हे ओघाने येते. परंतु मंत्रात 'शी' धातूचा स्पष्ट उपयोग करून ते सांगितलेले नाही हेही तितकेच खरे. प्रस्तुत लेखकाच्या माहितीप्रमाणे पुरुष शब्दाची

१. Introduction पृ. २४.

२. Indroduction पृ. ३१.

३. पुरश्चक्रे द्विपदः पुरश्चक्रे चतुष्पदः। पुरः स पक्षी भूत्वा पुरः पुरुष आविशत्॥ बृ॰ उप॰ २.५.८



अनुक्रमणिका

'पुरि शेते' अशी व्युत्पत्ती प्रथम शतपथ ब्राह्मणात[1] वायुरूप प्राणतत्त्वाला उद्देशून दिली आहे आणि नंतर गोपथब्राह्मणात प्राणाला पुरुष म्हणून संबोधिताना ती दिली आहे.[2]

## (२) प्राण

आपल्या प्रस्तावनेत शास्त्रीबुवांनी प्राण ह्या संकल्पनेच्या विकासाचेही सुरेख विवरण केले आहे. ह्या संकल्पनेची सुरुवात अथर्ववेदकाळी झालेली दिसते. अथर्ववेदात 'प्राणाय नमो यस्य सर्वमिदं वशे । यो भूतः सर्वस्येश्वरो यस्मिन्त्सर्वं प्रतिष्ठितम् ॥' (११.४.१) असा प्राणाचा महिमा वर्णिला आहे. शतपथब्राह्मणात 'प्राण' शब्दाची सर्वमान्य व्युत्पत्ती (प्र + अन्) डावलून ती ऐवजी प्र+नी अशी असाधारण व्युत्पत्ती सुचवून प्राणाच्या नेतृत्वाला बळकटी आणण्याचा प्रयत्न झाला आहे.[3] छांदोग्य-उपनिषदात रैक्वाने जानश्रुतीस शिकविलेल्या संवर्गविद्येत देवतांत वायू व इंद्रियांत प्राण यांचा 'संवर्ग' म्हणून उल्लेख केला आहे ( ४.३ ). शेवटी कौषीतकि-उपनिषदात 'प्राणो ब्रह्म' असे समीकरण मांडून प्राण हे परम तत्त्व असल्याचा निष्कर्ष सांगितला आहे (२.१).

## (३) आत्मन्–ब्रह्मन्

प्रस्तावनेच्या अखेरीस, 'आत्मन्–ब्रह्मन्' संकल्पनेचा प्रपंचही शास्त्रीबुवांनी समर्थपणे केला आहे.

### आत्मन्

उपनिषदांतील तत्त्वज्ञानाचा केंद्रबिंदू 'आत्मन्' असे म्हणायला हरकत नाही. ह्याविषयीच्या चिंतनाची सुरुवात शतपथब्राह्मणातील शाण्डिल्यविद्येत आढळते (१०.६.३.२). 'स आत्मानमुपासीत' असे आत्म्याची उपासना करण्यास सांगणारे वाक्य तिथे आहे. 'आत्मन्'विषयीच्या संकल्पनेच्या प्रारंभीच्या ह्या अवस्थेत तिची व प्राणसंकल्पनेची थोडी चुरस झाली असावी, आणि अखेर ह्या चुरशीत 'आत्मन्'ची सरशी झाली असावी, असे दिसते. शाण्डिल्यविद्येत आत्म्याच्या वर्णनात 'प्राण' हे आत्म्याचे शरीर असल्याचे ( प्राणशरीरम् ), आणि ते आत्मन् तत्त्व प्राणाचा आत्मा असल्याचे ( स प्राणस्य आत्मा ) वर्णिले आहे त्याबरोबरच पुरुषसंकल्पनेशी समन्वय साधण्यासाठी हा आत्मा 'अन्तरीचा हिरण्मय पुरुष' आहे असे म्हटले आहे ( एवमयमन्तरात्मन् पुरुषो हिरण्मयः). हाच आशय जवळजवळ ह्याच शब्दांत पुन्हा छांदोग्य उपनिषदात (३.१४) 'सर्वं खल्विदं ब्रह्म' अशी सुरुवात करून सांगितला आहे. मात्र तिथे हिरण्मयपुरुषाचा उल्लेख नाही. शतपथ-ब्राह्मण व छांदोग्य उपनिषद् यांच्यातील हा संबंध शास्त्रीबुवांनी "The doctrine of Sāṇḍilya is a veritable Sūtra embodying the essence of the doctrine of the Self in the Upaniṣads"[4] अशा समर्पक शब्दांत सांगितला आहे.

'आत्मन्' ह्या संकल्पनेचा आरंभ ऋग्वेदात इंद्रादिदेवता स्वतःला उद्देशून 'अहम्' चा प्रयोग करतात त्यांत शास्त्रीबुवा मानतात. त्यांच्या मते "The word Ātman is a synonym of of 'aham'."[5] शास्त्रीबुवांच्या ह्या कल्पनेत विचारांना एक निराळी दिशा देण्याचे सामर्थ्य आहे हे खरे. तथापि ऋग्वेदात एखाद्या मन्त्रात 'विश्वा जातान्यभ्यस्मि मह्ना ( साऱ्या सृष्टीपेक्षा मी मोठा आहे)[6] असे जेव्हा इन्द्र म्हणतो तेव्हा त्या वाक्यांत कल्पिलेले 'अहम्', आणि 'अहमेवेदं सर्वम्' ह्या उपनिषत्वाक्यातील ( छां. उप. ७.२५.१ ) 'अहम्' एकाच पातळीवरील आहेत, असे म्हणता येणार नाही. तसेच 'अहं धनानि सं जयामि शश्वतः' ( ऋ. १०.४८.१ ) ह्या ऋग्वेदमंत्रातील 'अहम्' आणि 'स आत्मा'[7] ह्या उपनिषत्वाक्यातील 'आत्मन्' हे समानार्थक नाहीत.

---

१. इमे वै लोकाः पूः । अयमेव पुरुषो योऽयं पवते । सोऽस्यां पुरि शेते । तस्मात् पुरुषः । १३. ६. २. १.

२. पुरिशयं सन्तं प्राणं पुरुष इत्याचक्षते १. १. ३९ ।

३. एष उ एव प्राणः । एष हीमाः सर्वाः प्रजाः प्रणयति । १०. ५. २. १४

४. Introduction पृ. ५८.

५. Introduction पृ. ४०, ३७.

६. ऋग्वेद ८. १००. ४

७. छां. उप. ६. ८.

ब्रह्मन्

उपनिषदांत अंतिम सत्याला 'ब्रह्मन्' अशीही संज्ञा आहे. ह्या संकल्पनेच्या विकासाचा आढावा शास्त्रीबुवांनी प्रस्तावनेच्या शेवटच्या भागात (पृ. ८८ व पुढे) घेतला आहे. त्यांच्या मते 'ब्रह्मन्'संकल्पनेचा आरंभ अथर्ववेदाच्या ब्रह्मसूक्तात[१] आढळतो. तत्पूर्वी ऋग्वेदकाळात 'ब्रह्मन्' शब्दाचा उपयोग ऋषींनी देवतांच्या स्तुतीसाठी रचलेले मंत्र अथवा सूक्त ह्या अर्थी होत असे. ह्या मंत्रांत वा सूक्तांत एक प्रकारचे दैवी सामर्थ्य असल्याची ऋषींना खात्री होती.[२] खुद्द देवांचे सामर्थ्यदेखील 'ब्रह्मन्' वर अवलंबून असे. देवांच्या रथाचे घोडे जसे 'ऋता'च्या साहाय्याने (ऋतयुज्) तसेच 'ब्रह्मन्'च्या साहाय्याने जोडले जात (ब्रह्मयुज्). सूक्त-मंत्रांना हे सामर्थ्य कशामुळे लाभत असे, ह्याविषयीचा विचार प्रस्तुत प्रस्तावनेत आढळत नाही. ते सामर्थ्य त्या सूक्तमंत्रांत ऋषी जे सत्य सांगत असत, त्या सत्याच्या सामर्थ्यामुळे त्यांना प्राप्त होत असे. हा एक मननीय विचार प्रा. ल्यूडर्स (Lueders) यांनी भरपूर पुरावा देऊन मांडला आहे.[३] ब्रह्मन् म्हणजे सत्य हे वैदिक काळातले एक समीकरण आहे, हे शास्त्रीबुवांनीसुद्धा शतपथब्राह्मणातील 'सत्यं ब्रह्मेत्युपासीत'[४] हे वचन उद्धृत करून स्पष्ट केले आहे. ब्रह्मन् ही एक प्रथमपासून प्रभावी शक्ती मानली गेली असल्याने शास्त्रीबुवांचे मत असे बनले आहे की, उपनिषत्पूर्वकाळापर्यंत आत्मन्–संकल्पनेचा विकास ते एक अंतिम सत्य असल्याचे मानण्यात, आणि ब्रह्मन्-संकल्पनेचा विकास ती एक वैश्विक शक्ती असल्याचे मानण्यात झाला. उपनिषदांत ह्या दोन्ही संकल्पनांचे बेमालूम एकीकरण केले गेले. (The meanings of the two words Ātman and Brahman developed along separate lines before the Upaniṣadic period so that while the one denoted the ultimate reality the other denoted the cosmic power. Thus this separation of meaning disappeared in the Upaniṣads and their meanings have perfectly blended together).[५]

## (४) ऋत–सत्य

पुरुष, प्राण व आत्मन्–ब्रह्मन् ह्या संकल्पनांच्या वैदिक काळातील विकासाचे दर्शन घडविताना शास्त्रीबुवांनी 'ऋता'चा ओझरता उल्लेख प्रस्तावनेच्या पृ. ३५ वर केला आहे. ऋग्वेदात 'ऋत' आणि तदुत्तर काळी 'सत्य' ह्या संकल्पनेला वेदात जे असामान्य महत्त्व आहे, ते लक्षात घेता 'ऋत–सत्या'ला प्रस्तावनेत योग्य स्थान दिले गेलेले नाही. ऋग्वेदात 'ऋत' ह्या संकल्पनेला अनन्यसाधारण महत्त्व आहे. ज्या अग्नी, इंद्र इत्यादी देवता सर्वश्रेष्ठ म्हणून ऋग्वेदात वर्णिल्या जातात, त्या देवताच मुळी 'ऋतजात' आहेत. त्यांचे शरीरसामर्थ्य 'ऋता'वर अवलंबून असल्याने त्या 'ऋतावृध्' आहेत. ऋताने विश्वाची उत्पत्ती आणि धारणा होते. ऋतामुळे सूर्य उगवतो, वारा वाहतो, आणि वृत्राने अडविलेले पाणी मोकळे होऊन पुन्हा नद्यांतून वाहू लागते. ऋत म्हणजेच सत्य, आणि ह्या सत्याचा व देवांचा इतका घनिष्ट संबंध आहे की, 'सत्यसंहिता वै देवा:'[६] अथवा, त्याच्याही पुढे जाऊन, 'सत्यमेव देवा:'[७] असे ब्राह्मणकाळात सांगितले गेले. ऋग्वेदात 'ऋताला' सर्वश्रेष्ठ शक्ती मानले असले, तरी त्याला इंद्रादी देवतांच्यासारखे पुरुषविधत्व दिले गेले नव्हते–म्हणजे ऋग्वेदात ऋताला हात, पाय, तोंड असल्याचे उल्लेख नाहीत. ऋग्वेदोत्तरकाळी 'ऋता'ऐवजी तपस्, प्राण, पुरुष, आत्मन्–ब्रह्मन् ह्यांसारख्या संकल्पनांना प्राधान्य मिळाल्याने 'ऋत-सत्य' संकल्पना मागे पडली. उदाहरणार्थ प्राण हे अंतिम तत्त्व मानण्याचा काळ होता, तेव्हा सत्य हे प्राणात अधिष्ठित असते असे शिकविले गेले. द्यापातपुत्र प्लक्षाकडे अरुणपुत्र सत्यंहाने आपल्या शिष्याला काही प्रश्न विचारण्यास

१. पैप्पलाद संहिता ८.९

२. "For the Vedas prayer has a holy potency." Introduction, पृ. ८८

३. H. Lueders, Varuṇa Vols. I and II.

४. शत॰ ब्रा॰ १०.६.३.१.

५. Introduction, पृ. ९५

६. ऐत॰ ब्रा॰ १.६.७

७. शत॰ ब्रा॰ १.१.१,४




पाठविले. त्याच्या प्रश्नांना उत्तरे देताना प्लक्षाने 'सत्य' म्हणजेच 'तपस्' असल्याचे सांगून हे तपस् बलरूपी प्राणात अधिष्ठित असल्याचे सांगितले. प्राण हा मात्र स्वयंप्रतिष्ठ, तो कशात प्रतिष्ठित आहे असा पुढचा प्रश्न (अतिप्रश्न) विचारायचा नाही. तो विचारला असता तर विचारणाऱ्याचे डोके तुटून खाली पडले असते.[1]

## मूळ ग्रंथ (पृ. १–५२४)

वर म्हटल्याप्रमाणे 'मंत्रब्राम्हणोपनिषद्' या ग्रंथात उपनिषदांत जे अध्यात्मदर्शन अथवा ब्रह्मदर्शन घडते तत्सदृश, तन्मूलस्वरूप, अथवा तद्बीजभूत जेवढा भाग उपनिषत्पूर्वकालीन वाङ्मयात म्हणजेच संहिता व ब्राम्हणे (आणि आरण्यके) ह्यांत मिळतो त्याचा एक सार्वभौम संग्रह (selected ... exhaustively, पृ. १०५) शास्त्रीबुवांनी केला आहे. अशा तऱ्हेचा संग्रह पूर्वी झालेला नव्हता. उपनिषदांत आढळणाऱ्या तत्त्वज्ञानाची बीजे मंत्र-ब्राह्मणांत आढळत असल्याचे काही विद्वानांचे मत होते, आणि तशी काही वचने दाखविलीही जात; परंतु ह्या साऱ्या वचनांचा एकत्र संग्रह करून प्रसिद्ध करण्याचा व्यासंगी उद्योग पूर्वी कुणी केला नव्हता. शास्त्रीबुवांच्या ह्या प्रकाशनाने ही सारी वचने एकत्रितपणे वाचून त्यावर विचार करणे अभ्यासकांना सोयीचे झाले.

ह्या साऱ्या एकत्रित केलेल्या वचनांची प्रथम (१) अग्नी, इन्द्र, सोम, इत्यादी देवता; (२) परमात्मा; (३) सृष्टी; (४) शारीर; (५) जीवगती; (६) धर्मतत्त्व; (७) श्रेयस्; आणि (८) प्रणव अशी विषयवार विभागणी करून नंतर वैदिक वाङ्मयाचा जो कालानुक्रम साधारणपणे मानण्यात येतो, तदनुसार ती छापली आहेत. प्रत्येक विषयावरची वचने देताना त्यांच्यातील आशयानुसार– जसे, अग्निदेवतेविषयी वचने देताना 'देव एव ऋत्विक् पुरोहितश्च, वैश्वानरो जनाधारः सर्वाग्निमूलं च, द्यावापृथिव्योः पतिः' इत्यादी– त्यांची जुळणी करून त्याप्रमाणे ती दिली आहेत. त्यामुळे ह्या वचनांतील आशय समजणे हा जसा एक मोठा फायदा होतो, तसेच ह्या ग्रंथासाठी शास्त्रीबुवांनी ही वचने कोणत्या कारणासाठी निवडली तेही सहज समजते. मूळ वचनांनंतर त्यांवरील उपलब्ध भाष्य (मुख्यत्वे सायणाचार्यांचे) छापले आहे. सायणाचार्यांनी केलेला अर्थ– विशेषतः ऋग्वेदमंत्रांचा– जरी नेहमीच स्वीकारता येत नसला, तरी एखाद्या मंत्राचा निदान एकतरी अर्थ तेवढ्यावरून समजण्यास निश्चित मदत होते. वाचकांची ही सर्व सोय काळजीपूर्वक केल्यानंतर एक बारीकशी सोय करण्याचे मात्र राहून गेले आहे. अग्नी, इंद्र इत्यादी विषयांचे नाव जर पृष्ठांच्या शीर्षभागी छापले असते, तर एखाद्या विषयावरील वचने कुठे सुरू होतात ते पहाणे सोपे झाले असते. ह्या त्रुटीची जाणीव होताच 'सृष्टी' ह्या विषयापासून मात्र (पृ. २७४ व पुढे) विषयाचे नाव पृष्ठाच्या शीर्षभागी देण्यास सुरुवात केली आहे. चूक लक्षात येताच ती दुरुस्त करणे– त्यामुळे ग्रंथात थोडी विसंगती निर्माण झाली तरी– ही गोष्ट स्तुत्य आहे.

मन्त्रब्राह्मणोपनिषदांत देण्यासाठी संहिता व ब्राह्मणे यांच्यातील वचनांची निवड करताना शास्त्रीबुवांनी जाळे फारच विस्तार करून टाकले आहे. ह्या ग्रंथाचे स्वरूप सार्वभौम वा अतिशयेन संग्राहक (exhaustive) करण्यासाठी त्यांना कदाचित त्याची आवश्यकता वाटली असेल. 'न घेतला असता तरी चालले असते' असा मन्त्र ग्रंथात आला तरी हरकत नाही, पण 'घ्यायला हवा होता, असा मात्र एकही मंत्र सुटू नये, अशी त्यांची दृष्टी असावी. परंतु हे मान्य करूनही असे म्हणावेसे वाटते की, उपनिषदांतील तत्त्वचिन्तनात्मक मुख्य विषयाशी संबंध न दिसणारे अनेक मंत्र ह्या संग्रहात समाविष्ट करण्यात आले आहेत.

ग्रंथाची सुरुवात अग्निदेवतेला उद्देशून रचलेल्या मंत्रांनी केली आहे. मथळा आहे : "परमात्मा अग्न्यादिदेवरूपः", आणि तळटीपेत खुलासा केला आहे तो असा : संहिता व ब्राह्मणांतून अनेक ठिकाणी अग्नी, इंद्र, वरुण इत्यादी देवतांची ते सर्वज्ञ, सर्वकर्ते, सर्वान्तर्यामी, सर्वदेवतात्मे इत्यादी परमात्म्याला

---

१. मा स्म प्राणमतिपृच्छ। ... यद्वै ब्रह्मचारिन् प्राणमत्यप्रक्ष्यः/मूर्धा ते व्यपतिष्यत्। तैत्ति. ब्रा. ३.१०.९.६





लागू पडतील अशा लक्षणांनी वर्णने केली आहेत. ह्या देवतांची अशी परमात्मलक्षणे जिथे स्पष्टपणे प्रतीत होतात ( परमात्मलक्षणं स्पष्टं प्रतीयते ), ते मन्त्र ह्या ग्रंथात उद्धृत केले आहेत.

अशी प्रतिज्ञा केल्यावर मग ग्रंथाचे सुरुवातीसच 'अग्निमीळे पुरोहितं यज्ञस्य देवमृत्विजम् । होतारं रत्नधातमम् ।।' हा जो ऋग्वेदसंहितेतील पहिला मन्त्र दिला आहे, त्यात अग्नीचे सर्वज्ञत्व, सर्वकर्तृत्व इत्यादींपैकी कोणते 'परमात्मलक्षण' स्पष्टपणे जाणवते की ज्यामुळे तो मन्त्र प्रस्तुत ग्रंथात, घेणे योग्य म्हणता येईल ?

ह्याउलट पृ. २७४ वर 'सृष्टिः' ह्या विषया-संबंधी मंत्र देताना दिलेला पहिलाच मंत्र असा आहे: 'एक एवाग्निर्बहुधा समिद्ध एकः सूर्यो विश्वमनु प्रभूतः । एकैवोषाः सर्वमिदं वि भात्येकं वा इदं वि बभूव सर्वम् ।।' ( ऋ. ८५८.२ ). अनेकांत एक किंवा एकाचे विश्वव्यापित्व पाहण्याचे हा मंत्र एक उत्कृष्ट उदाहरण आहे. विशेषतः, त्यातील शेवटच्या पादातील वि-भू या क्रियापदाच्या रूपाचा प्रयोग लक्षात घेण्यासारखा आहे. त्यामुळे हा मंत्र अत्यंत योग्य वाटतो.

अग्नी, इंद्र इत्यादी देवतांना त्यांची स्तुती करताना ते इतर देवतांपेक्षा श्रेष्ठ असल्याचे काही ठिकाणी म्हटले असले, तरी तेवढयाने त्यांचे पर-मात्मस्वरूप सिद्ध होत नाही; किंवा त्यांतील प्रत्येक देव इतर सर्व देवांचा आत्मा अहे, असेही त्यावरून म्हणता येणार नाही. ह्या सर्व देवता स्वतंत्र नसून त्या एकाच देवाची निरनिराळी नावे आहेत, ही कल्पना नंतरची आहे ( ऋ. १. १६४. ४६ ). पृष्ठ २- वर ऋ. १. ५९. ३ हा मंत्र दिला आहे. त्यात वैश्वानराग्नीला 'नृतम' म्हटले आहे. परंतु 'नृतमा'ने पुरुषोत्तमाची कल्पना सूचित होते असे म्हणणे चुकीचे ठरेल. सायणाचार्यही तसा अर्थ करीत नाहीत. 'नृतम' म्हणजे 'अतिशयेन सर्वेषां नेता' एवढेच ते म्हणतात.

पृ. ५-वर ऋग्वेदसंहितेच्या दुसऱ्या मंडलातील पहिली ऋचा उद्धृत केली आहे. ऋचेची सुरुवात 'त्वमग्ने द्युभिः... ( जायसे )' अशी असून मग अग्नीची पाणी, पाषाण ( अश्मन् ) व वनस्पती ( वनेभ्यः, ओषधीभ्यः) अशी निरनिराळी उत्पत्ति-स्थाने सांगितली आहेत. ह्या ऋचेला 'सर्वत्र द्युजल-वनादिष्वाविर्भवनशीलः' असा जो मथळा दिला आहे, त्यामुळे वाचकाची दिशाभूल होणे शक्य आहे. मथळयावरून ऋचेत अग्नीचे द्युलोक हे उत्पत्तिस्थान असल्याचे सांगितल्यासारखे वाटते. पण तसे ते सांगि-तलेले नाही मंत्रातील 'द्युभिः' शब्दाचा द्युलोकाशी संबंध नाही. ऋचेत 'द्युभिः' शब्दाने अग्नी ( दर ) दिवशी ( मंथनाने )उत्पन्न होतो, असे सांगितले आहे. सायणाचार्यही 'द्युभिः' पदाचा 'दिवस' असाच अर्थ देतात ( द्युभिः यागदिवसैर्निमित्तभूतैः जायसे यागार्थं मथनेन उत्पद्यस इत्यर्थः । यद्वा । तादृशैर्दि-वसैः सहितो जायसे । ). आपः, अश्मन् व ओषधयः ही अग्नीची तीन उत्पत्तिस्थाने प्रसिद्ध आहेत. त्यां-वरून तो 'सर्वत्र' आविर्भवनशील असल्याचा प्रत्यय येत नाही. अग्नीच्या ह्या वर्णनात 'सर्वत्रगम्' च्या कल्पनेचे बीज असेलसे वाटत नाही.

प्रस्तुत ग्रंथात वरुणविषयक मंत्र पृ. ७४-८६ वर दिले आहेत. 'मित्र' हा स्वतंत्र विषय केलेला नाही. वरुणानंतर विष्णु ( पृ. ८६-९३ ) व सवितृ ( पृ. ९३-१२० ) यांच्याविषयीचा मंत्र-ब्राम्हणभाग देऊन झाल्यावर 'द्यावापृथिव्यौ' विषयी पृ. १२१ वर मंत्र देण्यास सुरुवात करण्या-पूर्वी पृ. १२०-१२१ वर मोठी तळटीप दिली आहे. तीत सवितृ, मित्र, मित्रावरुणौ, पूषन्, भग, अपां नपात् व सूर्य यांच्यासंबंधीची फक्त ऋग्वेदसंहितेत आढळणारी विशेषणे बहुतांशी मूळ मंत्रात आहेत तशीच, परंतु काही ठिकाणी त्यांचा अनुवाद करून दिली आहेत.

ही विशेषणे देण्यापूर्वी एक खुलासा करण्यात आला आहे. त्यात वरील देवतांच्याविषयी स्वतंत्र विषय न करता त्यांचा तळटीपेत उल्लेख करून काम का भागविले आहे, ते सांगितले आहे. खुला-शात म्हटले आहे की, मित्र, वरुण, भग, सूर्य, अपां नपात्, पूषन् व सवितृ ह्या देवतांचा आदित्य या समूहवाचक नावाने ओळखल्या जाणाऱ्या देवतांत अंतर्भाव होत असल्याने (आदित्यत्वात्) आणि त्या सूर्यात्मक असल्याने ( सूर्यात्मकत्वात् ) त्यांच्यासंबं-धीचा मंत्रब्राह्मणभाग स्वतंत्रपणे उद्धृत केला नाही. वरुणदेवतेची आदित्यांत गणना होत असली, तरी









अनुक्रमणिका

त्याचे महामहित्व ऋग्वेदात स्वतंत्रपणे प्रकाशत असल्यामुळे त्याचा मात्र स्वतंत्र विषय केला आहे.

ह्या खुलाशावर अनेक आक्षेप घेणे शक्य आहे. प्रथम म्हणजे ह्या खुलाशात 'आदित्य' म्हणून ज्या देवतांचा नामनिर्देश केला आहे त्यात ज्यांचे नाव यायला हवे त्यांचा उल्लेख नाही; आणि ज्यांचे नाव यायला नको त्यांचा उल्लेख झाला आहे. शास्त्रीबुवांनी ह्या तळटीपेत फक्त ऋग्वेदसंहितेतील मंत्रांचा विचार केला आहे. तेव्हा ऋग्वेदापुरते बोलायचे झाले, तर त्या संहितेत एके ठिकाणी सात आदित्यांचा[1] आणि दुसऱ्या ठिकाणी अदितीच्या आठ पुत्रांचा उल्लेख झाला असला ( अष्टौ पुत्रासो अदितेः १०.७२.८ ),[2] तरी ऋग्वेदात ज्या एकाच ठिकाणी त्यांचा नावानिशी उल्लेख आहे तिथे ते सहाच – वरुण, मित्र, अर्यमन्, भग, अंश व दक्ष सांगितले आहेत ( २.२७.१ ). तेव्हा हे स्पष्ट व्हावे की, तळटीपेतील आदित्यांच्या परिगणनेत अर्यमन्, अंश व दक्ष यांची नावे देणे अत्यंत आवश्यक होते. विशेषतः 'अर्यमन्' चे नाव तर मुळीच गळायला नको होते. आदित्य जरी सहा असले तरी वरुण, मित्र व अर्यमन् ह्या तिघांचाच कित्येकदा एकत्र उल्लेख असतो ( ऋ. २.२७.८ ; ५.६७.१ ; १०.१८५.१ ). तळटीपेत आदित्यांच्या यादीत जशी वरील तीन नावे यायला हवी होती, तशीच त्यांत अपां नपात्, पूषन् व सवितृ यांची नावे यायला नको होती. सवित्याचा उल्लेख एकदा ( ८.१८.३ ) भग, मित्र, वरुण व अर्यमन् यांच्याबरोबर झाला असला, तरी त्याचा 'आदित्य' म्हणून स्पष्ट उल्लेख नाही.[3] दुसरा आक्षेप असा की, ऋग्वेदापुरते बोलायचे झाल्यास ह्या सर्व देवतांना सूर्यात्मक म्हणणे योग्य नाही. तळटीपेतील यादीत सूर्याचाही उल्लेख आहेच; आणि तो एकटा 'सूर्य' देव आहे, इतर नाहीत. तिसरा आक्षेप असा की, आदित्यांतले दोघे मित्र व वरुण हे जणू एकरूप असावेत इतके त्यांचे उल्लेख जोडीने येत असतात. तेव्हा त्यांतील वरुण या देवतेचा स्वतंत्र विषय करून मित्राला तळटीपेत स्थान देणे योग्य नव्हे. 'वरुणः' ह्याऐवजी 'मित्रावरुणौ' असा जोडनावाचा विषय केला असता तर आक्षेपाला जागा राहिली नसती. शेवटी थोडे तपशिलात जाऊन एक उणीव दाखवायची म्हटले तर ह्या तळटीपेत मित्र ह्या देवतेच्याविषयी जो चार विशेषणांची अत्यंत त्रोटक माहिती दिली आहे, त्याऐवजी स्वतंत्रपणे मित्राला उद्देशून असलेले ऋग्वेदातले एकुलते एक सूक्त ( ३.५९ ) संपूर्ण द्यायला हवे होते इतक्या योग्यतेचे ते आहे.

पृ. २०५ वर परमात्मा प्रकरण सुरू करून ते २७३ पृष्ठावर संपवले आहे. तळटीपेत म्हटले आहे की ह्या प्रकरणात, तसेच त्यापुढील 'सृष्टिः', 'यज्ञः' ह्या प्रकरणांत केवळ परमात्मपर असा जो आम्नायभाग आहे तो उद्धृत केला आहे. त्यामुळे ह्या प्रकरणांतून परमात्मपर नसलेला असा जो भाग आढळतो तो आला नसता, तर योग्य झाले असते. उदाहरणार्थ, पृष्ठे २१७-२१८ वर ऋ. १. १६४. २६-२९ ह्या ऋचा दिल्या आहेत. ह्या ऋचा निश्चितच प्रवर्ग्यविधीसंबंधी असून त्या विधीसाठी ज्या गायीचे दूध काढायचे तिचे, ज्या भांड्यात दूध तापवायचे त्याचे, ज्यांना दुधाचा हवी द्यायचा त्या अश्विना देवतांचे आणि दूध तापविताना होणाऱ्या आवाजाचे ह्या ऋचांत उल्लेख आहेत.[4] शास्त्रीबुवांनीदेखील ह्या ऋचांना 'सुदोग्ध्री गौः' असे सूचक शीर्षक दिले आहे. असे असताना ह्या ऋचा परमात्पर कशा होतात ?

शास्त्रीबुवांनी त्यांच्या प्रस्तावनेत ऋतविषयक विचार फार थोडक्यात आटोपता घेतला आहे. मूळ ग्रंथ देतानाही त्यांनी ऋताला व सत्याला फार थोडी जागा म्हणजे एकंदर दोन पृष्ठे ( ऋत– पृ. ४१८; सत्य– पृष्ठ ४१९) दिली आहेत. भारतीय संस्कृतीत आणि उपनिषदांतील तत्त्वज्ञानविषयक विचारात

१. देवा आदित्या ये सप्त ९.११४.३.

२. अथर्ववेदातसुद्धा आठ ( अदितिः अष्टपुत्रा ) ८.९.२१.

३. ऋ. ६.४९.१ येथे अग्नीचा वरुण व मित्र यांच्या जोडीने उल्लेख आहे. पण अग्नि आदित्य ठरत नाही ( सुक्षत्रासो वरुणो मित्रो अग्निः ).

४. Lueders, Varuṇa. pp. 362–363.

